'केशकर्तनकला' अर्थात्

# केशभूषा शास्त्र

आणि

# तंत्र

: लेखक :

आचार्य नंदन सखाराम कालेकर

किंमत २॥ रुपये

# समर्पण

नाभिक व्यवसायांतील दिवंगत, वर्तमान काळांतील आणि भविष्य काळांतील व्यवसायबंधूंस ह्या ग्रंथ सप्रेम समर्पण !



# भाकित खरें ठरलें

१९३६ सालच्या फेब्रुवारी महिन्यांतली एक सकाळ. रोजच्या प्रमाणें मी किर्लोस्कर मासिकांचें टपाल उघडीत असतांना, पोर्ट सैदच्या शिक्क्याचें एक पाकीट मला त्यांत आढळलें. विलायतला केशकर्तनाची कला शिकण्यासाठीं निघालेल्या एका महाराष्ट्रीय तरूणानें लिहिलेलें तें पत्र होतें.



त्यानें स्वतःबद्दल लिहिलेली हकीकत थोडक्यांत अशी. घरची अगदीं गरीबी, आईबापहि लहानपणींच निवर्तलेले. त्यामुळें मराठी शाळेंत जेमतेम तीन इयत्ता झाल्यावर या मुलाला एका केंस कांपण्याच्या दुकानांत महिना दोन रूपयावर नोकरीस रहावें लागलें. पण त्याला वाचनाचा नाद अतोनात. त्यामुळें त्याच्या विचारांना चांगलें वळण लागत गेलें. त्याची महत्त्वाकांक्षा जागृत होऊं लागली. स्वतःच्या भविष्याबद्दल तो सुंदर चित्रें रंगवू लागला. माणसाचा उत्कर्ष त्याच्या व्यवसायावर अवलंबून नसून त्याच्या प्रयत्नावर असतो हें त्याच्या लक्षांत आलें व त्याबरोबर एक उत्कृष्ट केशकर्तक बनून जगांत पुढें येण्याचें त्यानें स्वतःशीं ठरविलें.

या कलेचें मुंबईंत जेवढें शिक्षण मिळवितां येण्यासारखे होतें, तेवढे हस्तगत केल्यावर या विषयाचें अद्यावत् ज्ञान मिळवण्यासाठीं इंग्लंडला जाण्याची त्याला उत्कंठा वाटूं लागली. खिशांत कपर्दिका नसलेल्या व इंग्रजी भाषा न जाणणाऱ्या एका गरीब न्हाव्याच्या मुलानें असा हव्यास धरावा हा एक वेडे-पणा आहे असें कुणाला वाटलें असतें. पण त्याची क्षिती न बाळगतां या मुलानें आपली धडपड चालूं ठेविली आणि इच्छा आहे तिथें मार्ग सांपडतो या म्हणीप्रमाणें एक दिवस विलायतला जाणाऱ्या एका मोठ्या बोटीवर हेअर ड्रेस-रचें काम मिळवून त्यानें हिंदुस्थानचा किनारा सोडला.

ते तरूण गृहस्थ म्हणजे श्री. नंदनराव कालेकर हें सांगायला नको.

मी उत्तर देतांना नंदनरावांचें मनःपूर्वक अभिनंदन करून त्यांच्या अंगी-कृत कार्यांत पूर्ण यश मिळो अशी सदिच्छा व्यक्त केली. अशा तरूणाच्या साहसाबद्दल कोणाला कौतुक वाटणार नाहीं ! त्याबरोबर मी हेंहि सुचविलें कीं त्यांनीं आपलें प्रवासवर्णन व विलायतेंतील अनुभव लेखरूपानें मासिकाकडे पाठवावे. नंदनरावांच्या अंगी असलेल्या सुप्त लेखनकलेचा प्रत्यय त्यांच्या पत्रावरून मला आला होता. म्हणून ते एक लेखकहि होऊं शकतील असें मी त्या पत्रांत भाकित केलें होतें.

नंदनरावांनीं त्याप्रमाणें पाठविलेले लेख किर्लोस्कर मासिकांच्या वाचकवर्गास फार आवडले. त्यांनीं विलायतेला दोन फेऱ्या केल्या, व स्वतःच्या इच्छेनुसार केशकर्तन व केशभूषा या विषयाचें आधुनिक शिक्षण घेऊन हिंदुस्थानांत परत-ल्यावर मुंबईस ऑपेरा हाऊस जवळ “ओ. के. हेअर ड्रेसिंग सलून” या नांवाचें नमुनेदार दुकान सुरू केलें. पुढें थोड्या वर्षांनीं पुण्यालाहि त्यांनीं आपल्या संस्थेची शाखा सुरू केली. तथापि केवळ स्वतःच्या धंद्यांत नांवलौ-किक मिळवूनच ते स्वस्थ राहिले नाहींत तर केशकर्तनाचें सशास्त्र शिक्षण देण्यासाठीं “नंदन केशभूषा विद्यालय” या नांवाची त्यांनीं एक संस्था स्थापन केली आणि आज याच विषयावर एक पुस्तक लिहून त्यांनीं आपल्या कर्तबगारींत पुन्हा नवी भर घातली आहे.

नंदनराव एक लेखक होतील हें माझें भाकित खरें झाल्याबद्दल मला अर्थात

फार समाधान होत आहे आणि त्यामुळेंच या पुस्तकासाठीं प्रस्तावना लिहिण्याचें काम करतांना मला विशेष आनंद व्हावा हें सहाजिकच आहे.

मराठी भाषेंत केशभूषाशास्त्र आणि तंत्र याबद्दल इतका सुबोध व व्यवस्थित लिहिलेला हा पहिलाच ग्रंथ असावा. त्यासाठीं त्याची अपूर्वता आहेच पण तो लिहिण्यांत नंदनरावांनीं " जें जें आपुणासि ठावें, तें तें इतरां शिकवावें " अशा कळकळीच्या भावनेनें हें पुस्तक लिहिल्यानें त्यांनी आपल्या व्यवसाय-बंधूवर या पुस्तकाच्या द्वारें मोठेच उपकार करून ठेवले आहेत असेहि म्हणावे लागेल. ही प्रवृत्ती आपल्या देशांत फार कमी प्रमाणांत आढळते. उलट आपल्याला कोणत्याहि विषयांबद्दल जें थोडेफार ज्ञान संपादन झालें असेल तें एकाद्या कंजुष माणसाप्रमाणें इतरांपासून जितकें दडवून ठेवतां येईल तितकें ठेवण्याची बहुतेक खटपट करतात. ही गोष्ट कुठल्याहि शास्त्राच्या अथवा कलेच्या विकासाला बाधक झाल्यावाचून कशी राहील ?

सौन्दर्यप्रसाधन व केशभूषा यांचा आपल्या सांस्कृतिक जीवनाशीं जवळचा संबंध आहे. याचा दाखला द्यायला विशेष दूर जायला नको. एकाद्या देशांतील हेअर काटग सलून्स सहा महिने कांहीं कारणानें बंद राहिलीं तर तिथले लोक तेवढ्यामुळें कसे " जंगली " दिसतील याची कोणीहि सहज कल्पना करूं शकेल.

प्रस्तुत पुस्तकांत केशकर्तन, दाढी करणें, शांपू, मुखमर्दन याबद्दल दिलेली माहिती हा व्यवसाय करणाऱ्यांस फार उपयोगी पडेल यांत शंका नाहीं. त्याबरोबर हा धंदा यशस्वी करण्यासाठीं लेखकाने शेवटच्या प्रकरणांत जी माहिती दिली आहे ती सलूनचे मालक व त्याच्या हाताखालीं काम करणारे नोकर या सर्वांस अत्यंत बहुमोल ठरेल. ही माहीती म्हणजे नंदनरावांनीं या व्यवसायांत मिळवलेल्या यशाची सूत्रेंच आहेत. तेव्हां अशा उत्कृष्ट व उपयुक्त पुस्तकाचें त्या सर्वांकडून उत्साहपूर्वक स्वागत होईल अशी मी आशा बाळगतों.

किर्लोस्करवाडी
ता. २७ आगष्ट १९५३

शं. वा. किर्लोस्कर

# निवेदन

महाराष्ट्रीय संतमालिकेंत श्रीसंत सेनामहाराज हे भगवत्भक्त होऊन गेले. ते आपला नाभिक व्यवसाय कुशलतेनें करून ईश्वरभक्ति करीत असत. त्यांनी नाभिककलेच्या कौशल्यानें राजालादेखील मोहून टाकलें होतें; असें इतिहास सांगतो. त्याच महान संतशिरोमणीच्या चरणीं मस्तक ठेवून, मी हें निवेदन लिहीत आहें.

माझ्या बालपणाविषयीं थोडासा उल्लेख प्रस्तावनेंत आलेला असल्यामुळें, त्याची पुनरावृत्ति न करतां मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, माझे प. पू. मामासाहेब श्री. श्रीधरपंत देवजी माठे हे मला माझ्या पोरवयांत नाभिकव्यवसायासंबंधीं कल्पना व सूचना देत असत. नंतर कै. श्री. रामचंद्र राघूजी गायकवाड ऊर्फ फकीरबुवा रांजणीकर यांनी मला ह्या कलेची प्रत्यक्ष शिकवण दिली. अर्थात् तेच माझे खरे गुरुवर्य होत! परंतु माझ्या ज्ञानांत खरी भर पडली ती श्री. वि. म. गायकवाड यांच्या उपदेशामुळें. कारण १९३१ सालीं त्यांनी मला 'किर्लोस्कर' मासिकाचा वर्गणीदार होण्यास सांगितलें, आणि ते अंक नियमित वाचूं लागल्यापासूनच माझा उत्साह वाढूं लागला!

पूर्वी कै. शेलार, कै. मारुतीराव आळधुटीकर, कै. बंडोबा निघुणकर, कै. सखाराम लोणकर, श्री. शं. ग. गायकवाड, श्री. नारायण सोनावणे वगैरे लोक परदेशांत जाऊन आले होते. १९३३ सालीं माझे मामाहि इंग्लंडला जाऊन आले, आणि म्हणूनच आपणहि तिकडे जाऊन यावें, अशी इच्छा उत्पन्न झाली. 'इच्छा आहे तिथें मार्ग आहे' ह्या उक्तीप्रमाणें १९३६ सालीं

ता. ५ फेब्रूवारीला मी इंग्लंडच्या प्रवासाला निघालों. नंतर तरुणांचे सुप्रसिद्ध सद्गुरु श्री. शं. वा. किर्लोस्कर यांना एक पत्र लिहून, इतरांच्या माहितीसाठीं माझें प्रवासवर्णन ' किर्लोस्कर ' मध्यें प्रसिद्ध करण्याची विनंति केली. आनंदाची गोष्ट ही कीं, त्यानी त्वरित एअरमेलनें उत्तर पाठवून, माझी विनंति मान्य केल्याचें मला कळविलें व शुभाशीर्वादहि पाठविले. माझा उत्साह द्विगुणित झाला. पुढें मी पाठविलेले प्रवासवर्णनपर लेख जून १९३६ च्या व फेब्रूवारी १९३७ च्या ' किर्लोस्कर ' मध्यें प्रसिद्ध झाले. अर्थातूच त्यामुळें माझ्या महत्वाकांक्षेला फांद्या फुटूं लागल्या ! उत्कर्ष होऊं लागला ! !

परदेशांत, केशभूषेसंबंधानें मी जें जें पाहिलें व अनुभविलें, तें तें आपल्या देशांतील परिस्थितीप्रमाणें इकडेहि चालू करावें, अशी मला तीव्र इच्छा झाली. ती इच्छाहि मी श्री. किर्लोस्कर यांना कळविली. माझ्या कल्पनेला त्यांनी दुजोरा दिला. आणि त्याचें दृश्य फळ म्हणून १९४४ सालीं, आचार्य प्र. के. अत्रे यांच्या अध्यक्षतेखालीं ' नंदन केशभूषा-विद्यालय ' मी मुंबईत सुरूं केलें. त्यामुळें नाभिकतरुणांत नवचैतन्य निर्माण होऊन, बहुजनसमाजांतहि आमच्या समाजाविषयीं कुतुहल निर्माण झालें. मी कार्याला सुरुवात केल्यापासून मला ज्या अनेक सद्गृहस्थांचें, साहित्यिकांचें नि मित्रांचें साहाय्य झालें, त्यांत कै. देवकीलाल बोस, ( संपादक ' नाभिकसेवक ' ) श्री. स. ल. सीलम M. L. A; श्री. सुशीलराव कवळेकर, श्री. मानसिंगराव जगताप J. P. ( ऑ. प्रे. मॅ. ), धर्मवीर श्री. अ. ह. गद्रे, आचार्य अत्रे, श्री. मामा वरेरकर, सत्यवादीकार श्री. बाळासाहेब पाटील, लोकमान्यकार श्री. पां. वा. गाडगीळ, प्रा. अनंत काणेकर, श्री. दत्तोपंत बांदेकर, श्री. अप्पा पेंडसे, श्री. उमाकांत भेंडे, श्री. र. गो. सरदेसाई ( सं. तारका ), श्री. गणपतराव खराटे, श्री. विश्वनाथ बाबळे इत्यादींच्या नांवांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. साहित्यिकांशीं व पत्रकारांशीं परिचय वाढला, आणि ' पुष्पासंगे मातीस वास लागे ' ह्या न्यायानें पुढें मग मीहि ' किर्लोस्कर ' ' नवयुग ' इत्यादि नियतकालिकांत माझ्या परदेशपर्यटनाविषयीं कांहीं लेख लिहिले. त्यावरून स्फूर्ति घेऊनच कीं

काय न कळे, पण त्यानंतर श्री. ना. ल. तुपे, श्री. वि. ना. शिंदे, श्री. रघुवीर नंदन कालेकर, श्री. म. ल. शिंदे, श्री. नं. वि. शेलार इत्यादि तरुण, नाभिक व्यवसायाचें अधिक ज्ञान संपादन करण्यासाठीं इंग्लंडला जाऊन आले. श्री. स. ना. भालेराव हे व श्री. धर्माजी हे तिकडे गेले आहेत.

माझ्या व्यवसायबंधूंना जरूर तें मार्गदर्शन मिळावें आणि मजवर असलेल्या सामाजिक ऋणाची अंशतः फेड व्हावी ह्या सद्भावनेनें मी ' केशभूषाशास्त्र आणि तंत्र ' हें पुस्तक लिहिलें आहे. त्यासाठीं डॉ. **एन्. जी. मगर** Msc. Ph. D. ( कानडा ) यांचे व सुप्रसिद्ध साहित्यिक कॅप्टन **मा. कृ. शिंदे**. यांच्या लेखनविषयक अनुभवाचें मला अमोल साहाय्य झालेलें आहे. त्यांचा मी अत्यंत ऋणि आहें. त्याचप्रमाणें माझे मित्र श्री. वि. ना. शिंदे, श्री. ग. शं. जाधव ऊर्फ बाबूराव जवळेकर, श्री. गो. ग. पंडित, श्री. अनंतराव वाघ, श्री. शं. ल. राऊत, श्री. रा. य. शिंदे, श्री. ह. म. धामनीकर, श्री. बाबूराव मोरे, श्री. माने, श्री. वि. आ. गायकवाड, श्री. ब. मो. क्षीरसागर, श्री. पी. आ. सकपाळ, श्री. वाईकर गुरूजी, श्री. शिरनामे, श्री. ना. तु. वाघमारे आणि कदमबंधू इत्यादि माझ्या मित्रांनी व चहात्यांनी मला ह्या कामीं जें प्रोत्साहन दिलें त्याबद्दल त्यांचाहि मी आभारी आहें.

शेवटीं, पुस्तकांतील रेखाकृती काढून दिल्याबद्दल 'जयमा आर्ट प्रॉडक्शन' चे श्री. दादासाहेब भडसावळे यांचे, उत्तम छायाचित्रांबद्दल माझे मित्र श्री. उसेंकर, श्री. तेंडोलकर, श्री वसंतराव सोनगांवकर यांचे, मुखपृष्ठावरील दुरंगी चित्र काढून दिल्याबद्दल आर्ट कॉरनरचे श्री. केळकर, यांचे अल्पावधींत सुंदर ब्लॉक्स करून दिल्याबद्दल श्री. डी. बी. नेरॉय व पतंगे यांचे व पुस्तकाची अंतर्बाह्य छपाई सुबक केल्याबद्दल न्यू भारत प्रिंटिंग प्रेसचे मालक श्री. रघुनाथराव देसाई, मॅनेजर श्री. गणेशराव देसाई व जुळारीवर्ग यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानणें मी माझें कर्तव्य समजतों. त्याचप्रमाणें ह्या

पुस्तकाच्या प्रकाशनसमारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारल्याबद्दल महाराष्ट्राचे लोकप्रिय पुढारी नामदार श्री. **भाऊसाहेब हिरे** यांचाहि मी अत्यंत आभारी आहें.

माझी ही अल्प सेवा मराठी वाचकवृंद गोड करून घेईल अशी मला आशा आहे !

ओ. के. हेअर ड्रेसिंग सलून,<br>ऑपेरा हाऊस, मुंबई नं. ४<br>ता. १२-९-१९५३

सर्वांचा नम्र<br>**नंदन सखाराम कालेकर**

# केशभूषाशास्त्र आणि तंत्र

## अनुक्रमणिका



शिवाय निरनिराळ्या ५९ आकृति.



# केशभूषाशास्त्र आणि तंत्र

## : १ :

### पुरातन व आधुनिक माहिती

**प्रास्ताविक**

केशसंवर्धन व केशरचना ह्या दोन्ही कष्टसाध्य कला आहेत. शिल्पकला, चित्रकला अगर इतर दुसऱ्या कलांचें जसें विशिष्ट शास्त्र आणि तंत्र असतें, तसेंच तें केशभूषेचेंहि आहे. अर्थात् इतर कोणत्याहि कलांइतकेंच केशभूषेचेंहि महत्त्व आहे; इतकेंच नव्हे तर इतर कलांप्रमाणेंच केशभूषेला व केशभूषांतर्गत केशकर्तनकलेलाहि योग्य ती प्रतिष्ठा आहे व मानहि आहे. आपल्या देशांत आजपर्यंत केशभूषा-

शास्त्राला फारसें महत्त्व कोणी दिलें नाहीं; आणि त्या शास्त्राला ' शास्त्र ' ही संज्ञाहि अद्याप कोणी दिलेली नाहीं. उलट केशभूषा, केशकर्तन ह्या कलांचा उपहास व विटंबना करण्यांतच आपल्याकडील तथाकथित पंडितांनीं आनंद व अभिमान बाळगला ! परंतु आतां तसा काळ राहिलेला नाहीं. काळ बदलला आणि काळाबरोबर परिस्थितीनेंहि आपला जुनाट बुरखा झुगारून देऊन नवीन वस्त्रें धारण केलीं ! परिस्थितीच्या स्थित्यंतराबरोबरच समाजाचे व समाजाच्या घटकांचे विचार बदलत चालले ! याचें दृश्य स्वरूप म्हणजे नाभिक समाजासंबंधानें सुशिक्षितांत आढळून येणारी आस्था हें होय !

नाभिक समाजाविषयीं असलेले पूर्वग्रह समूळ नष्ट झाले आहेत, असामात्र याचा अर्थ नव्हे. नाभिक समाजानें आजपर्यंत जतन केलेल्या एका समाजोपयोगी कलेसंबंधानें कमी अनादर दिसून येतो हें खरें, परन्तु केशभूषाशास्त्राला व केशकर्तन कलेला मिळावी तशी प्रतिष्ठा अजूनहि मिळालेली नाहीं, असेंच दुर्दैवानें म्हणणें भाग आहे. त्याला अनेक कारणें आहेत. पुराणमतवादी, अट्टाहासी लोकांची, आकुंचित वृत्तींत जन्माला आलेली आंखूड दृष्टि आणि त्यांच्या मनाचा हलकेपणा हें जसें नाभिकाला त्याचे मानाचें न्याय्य स्थान न मिळण्याचें एक प्रमुख कारण आहे, त्याचप्रमाणें नाभिक समाजांतील शिक्षणाचा अभाव व स्वतःच्या अधिकाराविषयीं उदासीन व बेफिकीर राहाण्याची प्रबळ प्रवृत्ति हेंहि एक कारण आहे. अर्थात् नाभिकसमाजाविषयीं व त्या समाजानें सांभाळलेल्या, पोसलेल्या व वाढविलेल्या केशकर्तन व केशभूषा ह्या कलांविषयीं प्रतिष्ठितांना फारसें महत्त्व वाटलें नाहीं आणि त्यांचें महत्त्वहि पटलें नाहीं, ह्या दोषाचें खापर

एकट्या उच्चवर्णीयांच्या माथीं मारणें असमंजसपणाचें ठरेल ! ती आपलीहि चूक आहे. आपण आपल्या कलेचें महत्त्व व कौशल्य जाणत असलों, तरीहि तें कौशल्य व महत्त्व आम्हीं इतरांच्या नजरेला आणून देण्याचा आजपर्यंत कधींच प्रयत्न केलेला नाहीं; हें ऐतिहासिक सत्य आहे.

पाश्चात्य देशांत केशकर्तन व केशभूषा ह्या दोन्ही कला लोकादरासच नव्हे तर राजाश्रयासहि पात्र झालेल्या आहेत. त्या कलांचें विशिष्ट शास्त्र व तंत्र ठरून त्या त्या कलांवर उत्तमोत्तम असे असंख्य ग्रन्थ लिहिले गेले आहेत ! सर्वसामान्य माणसालाहि त्या कलांचें व त्या कलांच्या शास्त्राचें संपूर्ण ज्ञान झालेलें आहे. परंतु याचें श्रेय जनतेला नसून, आपली कला अशी अशी आहे, इतकी कठीण आहे, त्या कलेच्या मागें अशी अशी परंपरा आहे, ती कला म्हणजे आमच्या पूर्वजांनीं आपणां सर्वांच्या सेवेसाठीं दिलेला सांस्कृतिक वारसा आहे, असें तिकडच्या नाभिकसमाजांतील जाणत्या लोकांनीं कंठरवानें ओरडून जनतेला सांगितलें आहे. आपल्या कलेकडे लोकांचें लक्ष वेधलें जाईल अशी सांघिक चळवळ केली. उपयुक्तता आणि थोरवी विद्वानांच्या नजरेला आणून दिली. आणि म्हणूनच आज जगांतील प्रत्येक सुधारलेल्या राष्ट्रांत केशभूषा अगर केशकर्तनकला ' कला ' ह्या संज्ञेस पात्र ठरली.

आपला भारत देश आतां स्वतंत्र झालेला आहे. पारतंत्र्याच्या अंधारांत ज्या ज्या कलांचीं कलेवरें झालीं, त्या त्या कलांना नवदृष्टिकोनांचीं संजीवनी मिळून, त्या सर्व मृतप्राय झालेल्या अगर अज्ञातवासांत खितपत पडलेल्या कला आतां उफाळून उजेडांत आल्या पाहिजेत, आणि त्या त्या कलांनीं आपली कैफियत आपल्या जनतेच्या समोर प्रामाणिकपणें मांडून, सन्मान्य स्थान विभूषित करण्यासाठीं मोठ्या अभिमानानें

त्रिनदिक्कन पुढें आलें पाहिजे. तसें झालें तरच केशभूषेसारख्या कलेचें खरें महत्त्व व उपयुक्तता लोकांना पटेल आणि त्या कलेला मिळायला हवें तें मानाचें स्थान मिळेल ! मी हें पुस्तक ह्याच एका उद्देशानें लिहायला घेतलें. जोंपर्यंत आपण आपल्या कलेचें विशिष्ट शास्त्र आणि तंत्र ठरवून घेतलें नाहीं, आणि त्या शास्त्रतंत्रांतील खुबी व कौशल्य इतरांना पटवून दिलें नाहीं; तोंपर्यंत आपल्या कलेला कोणी नांवें ठेवलीं अगर नाकें मुरडलीं तर आपणतरी त्यांना कोणत्या तोंडानें दोष द्यायचा ? म्हणून आज हजारों वर्षें अस्तित्वांत असलेल्या, परंतु समाजांतील शिष्टजनांकडून उपेक्षिलेल्या केशभूषाशास्त्रासंबंधीं आपण अभ्यासपूर्ण माहिती मिळवावी व ती आपल्या इतर व्यवसायबंधूंच्या मार्गदर्शनासाठीं आणि समाजांतील सर्व थरांतील सर्व दर्जांच्या लोकांच्या माहितीसाठीं लिहून प्रसिद्ध करावी, असें मला कित्येक वर्षें वाटत होते. विशेषतः परदेशांतून केशकर्तनशास्त्राचा अभ्यास करून आल्यापासून माझ्या विचारांना अधिक गति मिळाली. परंतु ह्या ना त्या कारणामुळें ते माझे विचार आजपर्यंत कृतींत उतरूं शकले नाहींत. आज तें स्वप्न साकार होत असल्यानें मला कर्तव्यपूर्तीचें समाधान होत आहे एवढें मात्र खरें !

हें पुस्तक मी विशेषतः माझ्या व्यवसायबंधूंच्या माहितीसाठींच मुख्यतः लिहिलेलें असल्यामुळें, आजपर्यंत आपलें काम चोख व मनपसंत करीत असूनहि आपण करीत असलेल्या सेवाधर्माची महती व माहिती पुष्कळांना नसते; ती शास्त्रशुद्ध व तंत्रशुद्ध माहिती ह्या पुस्तकांत प्रामुख्यानें संकलित केलेली आहे. कोणत्याहि कलेचें शास्त्र व तंत्र यांविषयींचें पायाशुद्ध ज्ञान असलें, म्हणजे त्या कलेची सेवा आपल्या-

कडून अधिक कांटेकोरपणानें व निष्ठेनें होते. त्या कलेकडे पाहाण्याचा आपला रास्त दृष्टिकोन अधिक व्यापक बनतो व आपल्या व्यवसायाकडे आपण जास्त आदरभावनेनें पाहूं लागतों. ह्या पुस्तकांतली माहिती तेंच कार्य करील अशी माझी श्रद्धा आहे. त्याच श्रद्धेनें लिहिलेल्या ह्या पुस्तकाचा माझ्या व्यवसायबंधूंना उपयोग होईल अशी मला खात्री वाटते. प्रास्ताविक म्हणून एवढें लिहिल्यावर आतां प्रत्यक्ष विषयास सुरवात करतों.

## कांहीं पुरातन माहिती

केशकर्तन व केशभूषा हे शब्द आतां सर्वांच्याच परिचयाचे झालेले आहेत. परंतु ह्या शब्दांत ध्वनित होणारी क्रिया ही कांहीं आजकालची नाहीं. फार पुरातन आहे. बऱ्याच वर्षांपूर्वी श्री. वासुदेव गोविंद आपटे B. A. यांनीं 'मनोरंजन' मासिकाच्या एका अंकांत प्राचीन संस्कृत ग्रंथांच्या आधारानें स्त्रियांच्या भांगाचा त्रोटक इतिहास देतांना, त्यानीं हें सिद्ध केलें होतें कीं, भांग पाडणें, विविध प्रकारच्या वेण्या गुंफणें, अंबाडे-बुचडे बांधणें, ही केशभूषाकला आजकालची नसून फार पुरातन काळापासून चालत आलेली आहे.

जी गोष्ट स्त्रियांच्या केशभूषेची तीच गोष्ट पुरुषांच्याहि केशभूषेची आहे! आपल्या केसांची निगा राखणें व निरनिराळ्या तऱ्हेनें रचना करणें हें कांहीं आधुनिक तरुणांचेंच वेड आहे असें नसून, ऐहिक गोष्टीपासून अलिप्त राहाण्यासाठीं सदासर्वकाळ आध्यात्मिक चिंतनांत निमग्न असणाऱ्या ऋषिमुनींनाहि तें वेड होतें! अथर्ववेदांत (९-१३९-३७) जो एक मंत्र आहे, त्यांत 'खूप दाट व लांब

केंसांनीं आमचीं डोकीं झाकलीं जावीं ' असें मागणें देवापुढें मागितलेलें आढळून येतें. पुढें शतपथ ब्राह्मणांतमात्र ( ५-१,२,१४ ) पुरुषांच्या लांब केंसाविरुद्ध टीका केलेली आढळते. परंतु केंस हा विषय कोणत्या ना कोणत्या स्वरुपांत प्रत्येक कालखंडांत चर्चेचा विषय होता, हेंच ह्या-वरून सिद्ध होतें. म्हणजे ज्या अर्थी ' कपर्द ' व पुलस्ति ' अशासारखे केशरचनाविषयक शब्द प्रावीन साहित्यांत आढळतात, त्याअर्थी त्या काळींहि केशरचनाशास्त्राकडे दुर्लक्ष करण्यांत आलें नव्हतें असें ठाम मत मांडायला मुळींच हरकत नाहीं. कारण शतपथब्राह्मणांत विशिष्ट काळीं अगर विशिष्ट परिस्थितींत पुरुषांचे केंस कसे असावेत हें स्पष्टपणें सांगतलेलें आहे. शेंडी डोक्याच्या मध्यभागीं असावी व फक्त अशौच-काळींच ती बांधावी असें म्हटलेलें आहे. सारांश हा कीं, केस आणि केशरचना यांकडे पूर्वींपासूनच मनुष्यप्राण्याचे लक्ष असून, ती केशभूषा आवडीनिवडीप्रमाणें बदलत बदलत आजच्या अवस्थेला आलेली आहे, असें अनुमान निघतें. आवडनिवड ही अर्थात्च व्यक्तिनिष्ठ असल्यामुळें, त्या केशरचनेंत व केशभूषेंत विविध असंख्य फरक पडत गेले असावेत ! तें कांहीं असो, अधिक खोलांत न जातां आपण एवढेंच लक्षांत ठेवलें म्हणजे पुरे कीं, केशभूषा ही पुरातन विषयांपैकीं एक विषय असून त्या विषयाचे शिष्टसंमत विशिष्ट नियम ठरलेले होते. म्हणजेच केशभूषेचें एक शास्त्रच ठरलेलें होतें !

## आधुनिक माहिती

नाभिककलेची आधुनिक माहिती मोठी मनोरंजक आहे. केशकर्तन व केशभूषा ह्या कलांचा उगम कधीं व कसा झाला यासंबंधानें नक्की असें कांहीं सांगतां आलें नाहीं, तरी ती कला अत्यंत प्राचीन कालापासून

अस्तित्वांत आहे, इतकेंमात्र खरें. कांहीं लेखी पुराव्यांवरून व उत्खननांत सांपडलेल्या फण्या, आरसे, ब्रश, रंगप्रसाधनें इत्यादि वस्तूंवरून आतां असें नक्की सिद्ध झालेले आहे कीं, शेंकडों वर्षांपूर्वी प्राचीन इजिप्त व चीन ह्या देशांत नाभिकव्यवसाय कोणत्या ना कोणत्या स्वरुपांत चालू होता. इसवी सनापूर्वी ४०० वर्षांपासून ग्रीस व रोममध्यें लोक केस कापून घेत असत. रोममध्यें त्यावेळीं दाढी करून घेण्यासाठींसुद्धां लोक नाभिक-स्थानावर जात असत. नाभिकाचें दुकान म्हणजे गांवकऱ्यांचा एक अड्डाच असे! इतकेंच नव्हे तर नाभिक हेच त्यावेळचे शस्त्रक्रियाविशारद होते. आपल्या देशांतहि पूर्वी शस्त्रक्रियेचीं बारिकसारिक कामें व तुंबडया लावण्याची क्रिया नाभिकच करीत असत. अजूनहि अगदीं लहान लहान खेडयांत पायांच्या भोंवऱ्या कापणें वगैरे शस्त्रक्रियेचीं कामें नाभिकच करीत असलेले आढळतात.

'बार्बर' हा इंग्रजी शब्द 'Barba' ह्या शब्दापासून झालेला आहे. Barba ह्या शब्दाचा अर्थ 'दाढी' असा असून, कापणें, बारिक करणें, ह्या अर्थीहि तो शब्द वापरीत असत. ख्रिस्त शकापूर्वी शेंकडों वर्षे मॅसिडोनियन्स लोकांनीं दाढी करण्याचा पायडा पाडला व तेथून ती केशभूषापद्धति इजिप्त, चीन इत्यादि पौर्वात्य देशांत आली. परंतु केस कापण्याची मूळ कल्पना प्राचीन लोकांच्या विशिष्ट समजुतींतूनच जन्माला आली असावी, असें दिसतें. कारण मनुष्यप्राणी अगदीं रानटी अवस्थेंत असतांना, त्याच्या ज्या अनेक अज्ञानमूलक समजुती होत्या, त्यांत केंसावर जादूटोणा करून तो केंस ज्याचा असेल त्याच्यावर स्वतःची हुकमत

चालेल असें करणें किंवा त्याला वश करून घेणें सहज शक्य आहे, हीसुद्धां एक समजूत होती !

दाढीच्या केसांत तर अनेक समज आपलें घर करून बसले होते. प्राचीन काळीं बहुतेक सर्वच देशांत दाढी हें बुद्धीचें, आरोग्याचें व पौरुष्याचें लक्षण समजलें जात असे. आपल्याकडे जसा जावळ किंवा चौल करण्याचा सशास्त्र विधि करून तो एखाद्या समारंभासारखा साजरा करतात, तसाच एक विधि प्राचीन रोमन लोकांतहि अस्तित्वांत होता. बावीसाव्या वाढदिवशीं प्रथम केसांना कातरी लावली जाई. आणि तो केशकर्तनाचा प्रथम दिन मोठ्या समारंभानें साजरा केला जाई, असें इतिहास सांगतो.

शत्रूच्या तावडींत सांपडायला दाढी निमित्त होऊं नये, म्हणून दाढीचे केस कापण्यांत येत असत, आणि जित लोकांची विटंबना व्हावी किंवा त्यांना लांछन वाटावें म्हणूनहि दाढी छाटण्यांत येत असे. ज्युलिअस सीझरनें गॉल्स लोकांना जिंकल्यावर त्यांच्या दाढ्या कापून टाकल्या होत्या. त्याचप्रमाणें अलेक्झांडर धी ग्रेट यानें, आपल्या सैनिकांच्या दाढ्या धरून शत्रूनें पकडूं नये म्हणून त्या सर्वांना दाढ्या कापायला लावल्या होत्या !

पीटर धी ग्रेट हा बादशहा तर केसाचा कर्दनकाळच होता. त्यानें दाढीवर कर बसवला इतकेंच नव्हे तर, दाढी न ठेवण्याची सक्तीच केली ! सारांश 'यथा राजा तथा प्रजा' ह्या म्हणीप्रमाणें, कधीं राजानें आपल्या

लहरीप्रमाणें केशभूषेची पद्धत सुरु केली—सक्तीनें सुरू केली, तर कधीं राजसत्तेला मान तुकविण्यासाठीं किंवा तिला खूष करून स्वतःचा कार्यभाग साधून घेण्यासाठीं प्रजेनेंच स्वखुषीनें राजकेशभूषेचें अंधानुकरण केलें !

## नाभिक आणि शस्त्रक्रिया

मध्ययुगांत नाभिक लोक नुसती केशकर्तनकला व केशभूषाकलाच हस्तगत करून स्वस्थ बसले नाहींत; तर त्यानीं शस्त्रक्रियाविद्याहि हस्तगत केली होती ! आणि त्यामुळेंच त्यांना शस्त्रक्रियानिपुण-नाभिक ( barber surgeons ) अशा नांवानें संबोधिलें जात असे. त्या वेळचे धर्मोपदेशक हेच त्या काळचे खरे शस्त्रक्रियाविशारद होते. आणि ते शस्त्रक्रिया करतांना नाभिकांच्या अनुभवाची मुद्दाम मदत घेत असत. पुढेंपुढें शस्त्रक्रियाविद्येंत पारंगत असलेल्या नाभिकांची संख्या इतकी मोठी वाढली कीं, धर्मोपदेशकांनीं त्या फंदांत पडण्याचें कारणच उरलें नाहीं. आणि म्हणूनच तिसऱ्या पोप ॲलेक्झांडरनें खास फर्मान काढून धर्मोपदेशकांना शस्त्रक्रियेसारखा रक्तपाती व्यवसाय करायला बंदी केली.

नाभिक व्यवसाय दिवसेंदिवस इतका वाढूं लागला कीं, आपल्या व्यवसायिकांची एखादी संघटना असावी असें त्यांना वाटूं लागलें; व त्याप्रमाणें तेराव्या शतकांत ‘ लंडनची नाभिक मंडळी ’ ( Barber's Company of London ) ही संस्था स्थापन झाली. त्या मंडळीनें आपल्या

व्यवसायाच्या प्रतिष्ठेसाठीं नियम केले व त्या धंद्यांत उगीच लुडबूड करणाऱ्या अननुभवी लोकांच्या धंद्यावर नियंत्रण घातलें. त्यासाठीं तिसऱ्या एडवर्ड राजानें कांहीं व्यवस्था करून अननुभवी शस्त्रक्रियाकारांनीं नाभिकांच्या धंद्यांत हस्तक्षेप करूं नये असें ठरविलें.

पुढें मग नाभिक आणि शस्त्रक्रियाविशारद लोक यांच्यांत धंदाविषयक स्पर्धाच सुरू झाली ! नाभिक संघ जसे स्थापन झाले, तसे शस्त्रक्रियाविशारद संघहि स्थापन झाले. १३७१ सालीं फ्रान्स आणि जर्मनी ह्या देशांतहि वरीलप्रमाणेंच नाभिकांचे संघ स्थापन झाले. डच आणि स्वेडिश लोकांनीं जेव्हां अमेरिकेंत आपल्या वसाहती स्थापन केल्या, तेव्हांपासून अमेरिकेंत नाभिकजनांच्या संस्था स्थापन झाल्या.

शस्त्रक्रियाशास्त्राच्या प्रगतीसाठीं इंग्लंडमध्ये जे प्रयत्न झाले, त्यांत १४५० सालीं एक खास कायदा पास झाला व त्या कायद्यानें नाभिक संघ व शस्त्रक्रियाविशारद संघ यांचा समझोता होऊन नाभिकांनीं शस्त्रक्रिया करायची नाहीं आणि शस्त्रक्रियाकारांनीं केशकर्तन करायचें नाहीं, असें ठरविण्यांत आलें. परंतु त्यानंतर अनेक वर्षें नाभिकाच्या इतर हक्कांना धोका निर्माण झाला नाहीं. शस्त्रक्रियाविद्याविशारदांना जीं प्रमाणपत्रें देण्यांत येत असत, त्यावर ज्या गव्हर्नरच्या सह्या असत, त्यांत दोन नाभिक असत ! पण पुढें १७४६ सालीं एक नवा कायदा पास होऊन त्या कायद्यान्वयें नाभिक व्यवसाय व शस्त्रक्रिया व्यवसाय ह्या दोन व्यवसायांची कायमची ताटातूट करण्यांत आली.

परंतु त्यानंतरहि नाभिकांच्या संस्था, विद्यालयें, संघ इत्यादि संघटनात्मक प्रयत्न जगभर सुरू असून, कित्येक प्रागतिक राष्ट्रांनीं नाभिकजनांना व त्यांच्या धंद्याला व कलेला उत्तेजन मिळून, स्थिरपणा व उच्च दर्जा प्राप्त व्हावा म्हणून कायदेहि केलेले आहेत. आणि त्या कायद्यांच्या संरक्षणाखालीं नाभिकांच्या हक्कांची व इभ्रतीची जोपासना होत आहे. नाभिक व्यवसायाची व केशकर्तन-केशभूषाकलेची वर दिलेली त्रोटक माहिती पुरेशी आहे असें मला वाटतें. आपल्या धंद्याला विशिष्ट परंपरा असून केशभूषाशास्त्र हें वर्षानुवर्षांच्या, शतकानुशतकांच्या संस्कारानें परिपूर्ण होत आलें आहे, हाच वरील माहिती देण्यांत खरा उद्देश आहे.



: २ :

## केशभूषेचीं साधनें व त्यांची माहिती, व तीं वापरण्याची शास्त्रीय पद्धति

ह्या प्रकरणांत आपल्याला केशभूषेच्या साधनांचा विचार करायचा आहे. केशकर्तन करतांना अगर दाढी करतांना आज आपण जीं अगदीं आधुनिक प्रकारचीं साधनें व उपकरणें वापरतों, तशीं उपकरणें प्राचीन काळीं नव्हतीं. अश्म युगीन माणूस आजच्या सारखा नव्हता. त्याचीं साधनें किंवा हत्यारें म्हणजे दगड आणि लाकूड ! ज्या काळीं लोखंडाचा शोध लागला नव्हता, त्या काळीं तत्कालीन माणूस दगडांचा हत्यार म्हणून उपयोग करीत असे. अर्थात् केस कापण्यासाठीं तो धार काढलेली गारगोटी वापरी ! त्याचप्रमाणें कालवांच्या शिंपांना तीक्ष्ण

धार असल्यामुळें केस कापण्यासाठीं त्यांचाहि उपयोग केला जात असे ! म्हणजे तीक्ष्ण धार काढलेली गारगोटी आणि शिंपा हीं त्यावेळचीं केंस कापायचीं प्राथमिक हत्यारें होतीं ! पुढें जसजसे शोध लागत गेले, तसतसे ह्या हत्यारांतहि फेरबदल होत गेले आणि आज आपल्याला अत्यंत सोयीचीं, सोपीं व समाधानकारक काम देणारीं आधुनिक हत्यारें मिळूं लागलीं.

नाभिकाला आपल्या धंद्यांत मुख्यत: तीन हत्यारें वापरावीं लागतात. (१) वस्तरा, (२) साधी कातरी, (३) स्प्रिंगची मशीन ( Clippers ), आणि इलेक्ट्रिकच्या साहाय्यानें चालणारी कातरी ( Electric clippers ), हीं हत्यारें जितक्या प्रमाणांत चांगलीं असतील, तितक्या प्रमाणांत काम चांगलें होतें. परंतु नुसतीं हीं हत्यारेंच चांगलीं असूनहि भागत नाहीं; तर तीं हत्यारें हाताळण्याचीहि पायाशुद्ध माहिती नाभिकाला असावी लागते. कोणतें हत्यार कधीं कसें हाताळावें, कसें वापरावें, हेंच जर एखाद्याला माहित नसलें, आणि त्याच्या हातांत अगदीं उंची उत्तमोत्तम हत्यारें आणून दिलीं, तर तीं हत्यारें काय रडणार त्याच्यापुढें ! ज्याला त्यांचा वापर कसा करायचा हें माहित असेल त्यालाच त्यांचा उपयोग ! म्हणून कोणतेंहि हत्यार बरें अगर वाईट ठरवितांना आधीं आपल्याला तें हत्यार वापरायची माहिती आहे कीं नाहीं, याचा नीट विचार केला पाहिजे. नाहींतर 'नाचतां येईना— अंगण वांकडें' असेंच व्हायचें.

कोणतें हत्यार कसें वापरायचें याची माहिती नसली तर दुहेरी नुकसान होतें. एक तर तें हत्यार वापरणाराकडून गिऱ्हाईकाच्या मना-सारखें काम होत नाहीं म्हणून गिऱ्हाईक नाराज होऊन जातें. आणि

परत त्या दुकानाची चुकूनहि पायरी चढायची नाहीं अशी शपथ घेतें. आणि दुसरें म्हणजे कोणतेंहि हत्यार चुकीच्या पद्धतीनें वापरलें किंवा हाताळलें म्हणजे त्या हत्याराची कार्यक्षमताहि नष्ट होते! क्वचित् प्रसंगीं तें हत्यार नादुरुस्तहि होतें किंवा निकामी होऊन नुकसान होतें. म्हणून आपण जीं हत्यारें वापरतों, किंवा आपल्या धंद्यासाठीं जीं साधनें व उपकरणें वापरावीं लागतात, त्या सर्वांची आपणास पायाशुद्ध माहिती असणें जरूर आहे. (१) फण्या, (२) ब्रॅश, (केशभूषेचे व केश झाडायचे) (३) धार लावायचे दगड, आणि चांबड्याचे पट्टे, (४) साबणाचा फेंस काढायचे ब्रश, इत्यादि अनेक दुय्यम दर्जाचीं उपकरणें आपल्याला वापरावीं लागत असलीं, तरीहि प्रथम दिलेलीं तीन प्रमुख हत्यारेंच प्रामुख्यानें वापरायचीं असतात, आणि म्हणूनच ह्या प्रकरणांत त्याच हत्यारांची माहिती देत आहें.

**वस्तरा :**

वस्तरा घेतांना व पारख करतांना ज्या कांहीं मुख्य गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत त्या पुढीलप्रमाणें आहेत. (१) वस्तऱ्याचे अवयव (२) आकार, (३) लांबी, (४) रुंदी, (५) तोल, (६) पाणी, (७) पाजळलेली धार, आणि (८) एकंदर बनावट.

वस्तऱ्याचे एकंदर ११ भाग असतात. ते असे :—(१) मूठ, (२) देंठ, (३) खीळ, (४) कांडें, (५) टांच, (६) पातें, (७) धार, (८) टोंक, (९) डोकें, (१०) कणा आणि, (११) खांदा. (आकृति नं. १ पहा.)

वस्तऱ्याचें प्राथमिक स्वरूप आकृति नं. २ मध्यें दाखविल्याप्रमाणें होतें. म्हणजे पातें भरीव होतें. परंतु त्यांत सुधारणा होत होत शेवटीं आकृति नं ३ मध्यें दाखविल्याप्रमाणें पातें अंतर्वक्र होत गेलें आणि संपूर्ण अंतर्वक्र पातें ( आकृति नं. ४ पहा ) असलेला वस्तरा वापरायला व कामाला चांगला असतो असें अनुभवानें ठरलें आहे. त्याला धार काढणें सोपें असतें इतकेंच नव्हे तर त्या पात्याला तीक्ष्ण धारहि चटकन येते.

बाजारांत अनेक प्रकारचे वस्तरे मिळत असले, तरी शेफिल्ड येथें जर्मन पद्धतीच्या पाजळीनें तयार झालेले पूर्ण अंतर्वक्र पात्याचे वस्तरेच उत्तम असतात. वस्तरा म्हणजे एका खिळीनें मूठ बसविलेलें एका बाजूसच तीक्ष्ण धार असलेलें पोलादी पातें असतें. ह्या पात्याला पुष्कळदां चंदेरी गिलीटहि चढविलेलें असतें. तसल्या गिलीटानें वस्तरा वरून दिसायला लखलखीत दिसला तरी आंतल्या पोलादाची पारख होणें कठीण असतें. कित्येकदां तर हलक्या जातीचें पोलाद वापरलेलें असण्याचाहि संभव असतो. म्हणून वरच्या भपक्याला न भुलतां, साधें पॉलीश असलेल्या पात्याचेच वस्तरे निवडावे. म्हणजे हलकें पोलाद पदरीं पडण्याचा संभव नसतो. वस्तऱ्याचें पातें एका बाजूनें निरखून पाहिलें असतां आकृति नं. १ मध्यें दिलेले वस्तऱ्याचे अकरा **अवयव** स्पष्टपणें दिसून येतात.

वस्तऱ्याच्या पात्यांचे **आकार** इंचाच्या आठव्या अगर १६ व्या भागांच्या प्रमाणांत असतात. म्हणजे ४/८, ५/८, ६/८, ७/८ असे. ( आकृति नं. ५ पहा. ) त्यांतल्या त्यांत ५/८ आकाराच्या पात्याचा वस्तरा जास्त प्रमाणांत वापरला जातो. **लांबीरुंदी** आपणांस वस्तरा हातांत घेतल्याबरोबरच समजत असल्यामुळें त्या बाबतींत विशेष लिहिण्याची जरुरी नाहीं. **वस्तऱ्याचा तोल** पात्याची लांबी व वजन यांची प्रमाणबद्धता व मूठ




यांच्यावर अवलंबून असतो. वस्तरा समतोल असला कीं हाताळायला सोपा वाटतो, आणि हातहि नितळ चालतो. वस्तऱ्याचें **पाणी** म्हणजे पातें पाजळण्याची खुबी ! पातें दगडावर घांसून घांसून त्याला जी **धार** आणतात ती पहावयाची असते. भरीव पात्याची धार आणि अंतर्वक्र पात्याची धार वेगवेगळ्या पद्धतीनें काढली जाते. म्हणजे पाजळण्याची वेगवेगळी तऱ्हा असते. एकंदर **बनावट** म्हणजे वस्तरा तयार करणाऱ्या कारखान्याचें नांव अगर बोधचिन्ह, वरचें गिलीट अगर पॉलीश, ह्या गोष्टीहि वस्तऱ्याच्या बाबतींत अवश्य लक्षांत घ्याव्या लागतात.

**वस्तरा लावणें**

वस्तऱ्याला धार लावण्यासाठीं मुख्यतः दोन साधनांचा उपयोग करतात. ( १ ) धार काढावयाचा दगड, आणि ( २ ) पट्टा. धार काढायचे दगड दोन प्रकारचे असतात. ह्या दगडांना '**होन्स**' असें म्हणतात. हे होन्स दोन प्रकारचे आहेत. ( १ ) नैसर्गिक दगड ( Quarried ) आणि कृत्रिम दगड ( Manufactured ). नैसर्गिक दगडाचेहि दोन प्रकार आहेत. ( १ ) **वाटर होन**:—हा दगड नरम चिकणमातीच्या रंगाचा असतो; आणि धार सावकाश येते म्हणून ह्याला मंद दगड म्हणतात ( २ ) **बेल्जियन होन**:—हा दगड बेल्जियम येथील खाणींत सांपडतो व तो पिवळ्या व लाल रंगाचा असतो. वरचा धार काढायचा थर पिवळसर रंगाचा असतो व खालचा थर गडद लाल रंगाचा असतो. हा दगड उत्तम असतो व वाटर होन पेक्षां ह्या दगडावर वस्तऱ्याला जलद धार येते.

कृत्रिम दगडामध्यें '**स्वाती**' ( Swaty ) नांवाचा दगड उत्तम असून ह्या दगडानें त्वरित धार येते. आणि म्हणूनच ह्याला जलद दगड म्हणतात. धार लावतांना—कोणत्याहि जातीचा दगड असो—दगडाला थोडेंसें पाणी अगर साबणाचा फेंस लावून धार काढतात.

धार काढण्याचें दुसरें साधन म्हणजे **पट्टा** ! हे पट्टे दोन प्रकारचे असतात. ( १ ) चांबड्याचा पट्टा आणि ( २ ) कॅनव्हासचा पट्टा.

( १ ) **चांबड्याचा पट्टा** : हा पट्टा घोडा, गाय किंवा डुक्कर यांच्या विशिष्ट कातड्यापासून तयार केलेला असतो. ' रशियन स्ट्रॅप्स ' नांवाचे

जे चांबडी पट्टे मिळतात ते गायीच्या कातड्यापासून तयार केलेले असतात. ( चांबड्याच्या पट्टयाच्या मागच्या बाजूला कॅनव्हास असतें. )

( २ ) **कॅनव्हासचा पट्टा** : हा पट्टा लिनन किंवा रेशीम यांपासून तयार करतात.

वरील दोन्ही प्रकारच्या पट्टयांत कातड्याचा पट्टा वापरायला व टिकायलाहि बरा असतो असा अनुभव आहे.

**धार लावण्याचें तंत्र** : वस्तऱ्याला धार लावण्याचें कसब सरावानें आत्मसात होतें. धार लावतांना विशेषतः खालील गोष्टी ध्यानांत ठेवाव्या.

( १ ) वस्तऱ्याचें पातें धारेच्या दगडावर घांसतांना, धारेच्या बाजूनें टांचेपासून टोंकापर्यंत तिरपें ओढावें. ( आकृति नं. ६ पहा. )




( २ ) पहिला झटका संपतांच हाताच्या मनगटाला मुरड न घालतां फक्त बोटांनींच वस्तरा फिरवावा व दुसरा झटका द्यावा. ( आकृति नं. ७ पहा. )

( ३ ) डाव्या हाताच्या आंगठ्याच्या नखावर वस्तऱ्याची धार फिरवून अजमावणें.





( ४ ) चांबड्याच्या अगर कॅनव्हासच्या पट्टयावर वस्तरा फिरवतांना दगडावर फिरवायच्या उलट पद्धतीनें फिरवावा. म्हणजे धारेकडच्या

दिशेनें वस्तरा न घासतां कण्याकडच्या दिशेनें वस्तरा ओढावा.
( आकृति नं. ८ व ९ पहा )



**दगड आणि पट्टा यांची निगा राखणें:—**धारेचा दगड किंवा पट्टा यांची निगा राखावी लागते. निष्काळजीपणानें त्या वस्तू वापरल्यास त्या वस्तूंची खराबी तर होतेच, शिवाय आर्थिक नुकसानहि होतें. ह्या वस्तू तुम्हीं जितक्या काळजीपूर्वक वापराल तितक्या त्या जास्त टिकतील. दगड अगर पट्टा वापरण्यापूर्वी तो थोडासा ओलसर करा. बेल्जियन आणि स्वाति दगडांना आधीं साबणाचा फेंस लावा. दगड वाळल्यावर स्वच्छ धुऊन, पुसून कपाटांत झांकून ठेवा.

पट्टयाच्या बाबतींतहि तसेंच आहे. पट्टा गुंडाळून ठेवूं नये. तो लोंबत स्वच्छ ठेवावा. चांबडयाच्या पट्टयावरचा बुरा काढून टाकण्यासाठीं साबणाचा जाड फेंस रगडून कात्रीच्या पात्याच्या मागच्या बाजूनें वरच्यावर खरडावें.

दगडावर घांसून धार काढल्यावर त्या पात्याला जे सूक्ष्म दाते पड-तात, ते नितळ करण्यासाठीं वस्तरा पट्टयावर पाजळणें जरूर असतें; हें विसरतां कामा नये. वस्तऱ्याला नुकतीच धार काढलेली असेल तर कॅनव्हासच्या पट्टयापेक्षां चांबडयाचा पट्टा वापरावा.

## कातरी

नाभिकव्यवसायांत ज्या कातऱ्या वापरल्या जातात. त्यांत जर्मन आणि फ्रेंच कातऱ्याच अधिक लोकप्रिय आहेत. जर्मन कातऱ्यांना फ्रेंच कातरी प्रमाणें बोटाच्या मुदीला लागून इतर बोटांसाठीं लांबोडी बैठक नसते. कात-रीच्या दोन्हीं पात्यांना धार असली तरी त्या पैकीं आंगठयाची मुदी असलेलें एक पातेंच हालत असतें व दुसरें बोटाची मुदी असलेलें पातें स्थिर असतें.




( आ. १० पहा ) लांबी व पात्यांचें पाणी ह्या बाबतींत कातरीमध्यें फरक

असतो. सर्वसाधारणपणें सात इंची व साडेसात इंची कातऱ्या केशकर्तनासाठीं उपयोगी असतात.

आज जी क्लीपर्स ह्या नांवानें स्प्रिंगची हात मशीन ओळखली जाते, ती यांत्रिक कातरी प्रथम अमेरिकेंत १८७९ सालीं तयार करण्यांत आली. मे. ब्राऊन ॲनशार्प ( Messrs Brown & Sharpe ) ह्या कंपनीनें त्या कातरीचें प्रथम पेटंट घेतलें. त्यानंतर सर्व जगभर ह्या कात्र्या लोकप्रिय झाल्या. केंस कापण्यांतील कमी जास्त प्रमाणावरून ह्या कात्र्यांना ८ प्रकारचे नंबर दिले गेले, ते असे:

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नं. | ०००० | ह्या | कातरीनें जवळ जवळ वस्तऱ्यानेंच केंस काढल्यासारखे केंस कापले जातात. | | | | | | |
| ,, | ००० | ,, | ,, | केसाच्या | १/१०० | लांबीपर्यंत | केंस | कापले | जातात. |
| ,, | ०० | ,, | ,, | ,, | १/६४ | ,, | ,, | ,, | ,, |
| ,, | ० | ,, | ,, | ,, | १/३२ | ,, | ,, | ,, | ,, |
| ,, | ०A | ,, | ,, | ,, | ३/६४ | ,, | ,, | ,, | ,, |
| ,, | १ | ,, | ,, | ,, | १/८ | ,, | ,, | ,, | ,, |
| ,, | २ | ,, | ,, | ,, | १/४ | ,, | ,, | ,, | ,, |
| ,, | ३ | ,, | ,, | ,, | ५/१६ | ,, | ,, | ,, | ,, |

सर्वसाधारणपणें ००००, ०००, १ व २ ह्या नंबरच्या क्लिपर्स ( मशिनी ) व्यवहारांत उपयोगी पडतात.

**क्लिपर्स** : क्लिपर्स दोन प्रकारच्या असतात. ( १ ) स्प्रिंगची क्लिपर ( आकृति ११ ) आणि ( २ ) इलेक्ट्रिक क्लिपर ( आकृति १२ ). कर्तनाच्या जाड बारिकपणाप्रमाणें त्यांच्या खुणा असतात. ०००० ह्या अगदीं आंखूड कर्तनक्षमतेपासून तों ०००,००,० आणि १ अशा लांब कर्तनक्षमतेपर्यंत नंबर घातलेले असतात.



११

**फण्या** : आपल्या देशांत लांकडापासून जनावरांच्या शिंगापासून व हत्तीसारख्या प्राण्यांच्या हाडांपासून फण्या बनविण्याची रीत फार प्राचीनकाळापासून आहे. परंतु १८८२ सालापासून यांत्रिक साधनांनीं फण्या बनूं लागल्या. नाभिक व्यवसायांत वापरावयाच्या फण्या रबरापासून अगर हाडांपासून बनविलेल्या असाव्या. त्यांचे दांत प्रमाणशीर दाट किंवा विरळ असावेत. फण्या दमट हवेंत अगर उष्णतेंत ठेवूं नयेत. थंड व कोरडया जागीं ठेवल्यानें त्या अधिक काळ टिकतात.

**ब्रश** : केस कापल्यावर ते साफ करायला व केस विंचरून ते चापचोप बसवायला निरनिराळे ब्रश मिळतात. केस झाडायचा ब्रश व केस चापचोप नीटनीटके बसवायचा ब्रश यांत फरक असतो. पहिल्या

प्रकारचा ब्रश नरम केंसांचा असतो, तर दुसऱ्या प्रकारचा ब्रश ताठ केंसांचा असतो. ब्रश विकत घेतांना ब्रशाच्या केंसांत कोणत्याहि प्रकारचे सूक्ष्म जंतू नाहींत अशी खात्री करून घ्यावी व नंतरहि ब्रश स्वच्छ ठेवण्याची दक्षता बाळगावी. केशकर्तन संपल्यावर गिऱ्हाईकाच्या डोक्यावरील केसांत पडलेली केंसांचीं बारिकबारिक खुटणें झाडून टाकण्यासाठीं इलेक्ट्रिकनें गरगर फिरणारा ब्रशहि मिळतो. पण तो ब्रश सर्वच गिऱ्हाईकांना आवडतोच असें नाहीं. ब्रश वापरतांना गिऱ्हाईकाची आवडनिवड अवश्य लक्षांत घेतली पाहिजे.

केशकर्तनाचीं व केशभूषेचीं साधनें व त्यांची संक्षिप्त माहिती दिल्यानंतर आपण आतां दाढी करण्याच्या क्रियेसंबंधानें पुढील प्रकरणांत विचार करूं.



: ३ :

## दाढी करण्याची कला

दाढी करतां येणें हें नाभिक व्यवसायांतील एक आद्य आणि प्राथमिक स्वरुपाचें कसब आहे. ह्या कसबाला फारशी बुद्धिमत्ता लागत नाहीं. हें खरें असलें, तरीहि दाढी करण्यासाठीं गिऱ्हाईकाची तयारी करणें व यथायोग्य रीतीनें वस्तरा हाताळतां येणें, ह्या दोन गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या आहेत, हें विसरून चालणार नाहीं. त्याचप्रमाणें काम करण्याची चपळाई, तत्परता आणि काळजीपूर्वक काम करण्याची हातोटी, हे गूण म्हणजे दाढी करण्याच्या कामगिरींतील यशाची गुरुकिल्लीच होत. डोकीवरील केसांपेक्षां गालांवरील केंस चौपट दाट असतात. एक चौरस इंच जागेंत सुमारें ७०० ते ८०० केंस असतात आणि मनुष्याच्या डोकीवरच्या सर्व केंसांची संख्या एक लाख ३२ हजार असते, असें संशोधकांचें मत आहे.

केंशकर्तनापेक्षांहि दाढी करण्यासाठींच गिऱ्हाइकें नाभिकाच्या दुकानांत वारंवार येत असतात; आणि दाढी करवून घेण्यानें जर त्यांचें संपूर्ण समाधान झालें नाहीं, तर पुढें केशकर्तनासाठीं तें गिऱ्हाईक त्या दुकानांत पाऊलहि टाकणार नाहीं. म्हणून गिऱ्हाईकाचें संपूर्ण समाधान होऊन, तें खूष होऊन जाईल अशा रीतीनें दाढी करतां येणें हा नाभिक व्यवसाय-शिक्षणांतील खरा श्रीगणेशा आहे !

आधीं दाढी करण्यासाठीं उपयोगांत आणावयाच्या उपकरणांची नाभिकानें संपूर्ण व पायाशुद्ध माहिती घेतली पाहिजे. त्याचप्रमाणें तशी माहिती घेतल्यावर तीं उपकरणें व साधनें कशीं वापरावयाचीं याचीहि माहिती घेतली पाहिजे. दाढी करावयाचीं सर्व साधनें आधीं उकळत्या पाण्यांत घालून काढावीं. (हत्यारांच्या स्वच्छतेविषयीं अधिक माहितीसाठीं प्रकरण नं. ११ पहा.) त्याचप्रमाणें दाढी करण्याच्या क्रियेचीं कांहीं मूलभूत तत्त्वें व नियम असले तरी कांहीं अपवादहि असतात. म्हणून गिऱ्हाईकाची दाढी करतांना घे वस्तरा नि चालव सपासप असें न करतां, आधीं त्याच्या केंसांची जात, केंसांचा राठ–नरमपणा, केंसांचें वळण इत्यादि गोष्टी लक्षांत घ्याव्या व त्या त्या अनुरोधानेंच वस्तरा फिरवायची दिशा ठरवावी. त्याचप्रमाणें चेहऱ्याच्या कातडीची संवेदनक्षमता व वस्तऱ्याची धार यांचाहि विचार करावा. चेहऱ्यावर उष्णतेनें अगर थंडीनें पुळ्या आलेल्या असल्या किंवा कातडीला भेगा पडलेल्या असल्या, तर गरम टॉवेल ( Hot towel ) वापरूं नये. वस्तरा चालवतांनाहि खबरदारी घ्यावी. पुळ्या पुरमें असलेल्या गिऱ्हाईकाची दाढी केल्यावर त्याच वस्तऱ्यानें दुसऱ्या गिऱ्हाईकाची दाढी न करण्याची खबरदारी घ्यावी. तसें न केल्यास त्या रोगाच्या संसर्गानें दुसऱ्या गिऱ्हाईकाच्याहि चेहऱ्याची खराबी होईल; आणि त्या रोगाचा हां हां म्हणतां प्रसार होईल. म्हणून जरूर ती

खबरदारी घेतली पाहिजे. नाभिकाचें तें एक आद्य सामाजिक कर्तव्य आहे. सामाजिक आरोग्याला अपाय न होतां आपला धंदा चोख करण फारसें कठीण नाहीं. मात्र त्यासाठीं निष्काळजीपणा केला नाहीं म्हणजे झालें.

## दाढी करण्याची पूर्व तयारी

दाढी करण्याच्या क्रियेस प्रत्यक्ष सुरवात करण्यापूर्वी ज्या कांहीं गोष्टी कराव्या लागतात त्या पुढीलप्रमाणें आहेत.

( १ ) गिऱ्हाईक खुर्चीवर बसल्यावर स्वच्छ चादरीनें गिऱ्हाईकाचे कपडे झांकणें.

( २ ) खुर्चीच्या मागील, गिऱ्हाईकाच्या मानेसाठीं असलेला टेकू प्रमाणांत ठेवणें.

( ३ ) गिऱ्हाईकाच्या मानेच्या उजव्या बाजूला टॉवेलाचें एक टोंक खोंचून डाव्या बाजूला दुसरें टोंक खोंचणें.

( ४ ) चेहऱ्याला ( दाढी करावयाच्या भागाला ) फेंस लावणें.

( ५ ) फेंसावर वाफयुक्त टॉवेल गुंडाळणें. ( हें साधन सर्वसाधारण दुकानांत असत नाहीं. )

( ६ ) वाफयुक्त टॉवेल व फेंस काढून परत फेंस लावणें.

वरील तयारी केली, तरीहि एक मुख्य गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती हाताच्या लवचिकपणाची व मनगटाच्या नरमपणाची. कारण नाभिकाचे हात हे एखाद्या माळ्याच्या, सुताराच्या अगर लोहाराच्या हातासारखे कडक असून चालणार नाहीं. ते अगदीं नरम व नाजुक असले पाहिजेत.

एखाद्या कसबी घड्याळजीच्या हातांसारखे लवचिक असले पाहिजेत. तसेंच त्याचें मनगटहि सहज हवें तसें वळेल असें नरम हवें. तें कडक असतां कामा नये. कारण गिऱ्हाईकाच्या दाढीवरून वस्तरा फिरत असतांना केंसतर निघालेच पाहिजेत, पण आपल्या चेहेऱ्यावर वस्तरा फिरवला जात आहे, असें गिऱ्हाईकाला मात्र वाटूं नये ! नाहींतर आपली चामडीच तासली जात आहे, अगर सोलली जात आहे असें गिऱ्हाईकाला वाटलें आणि दाढी करण्याचा त्रास होऊन त्याच्या डोळयांत पाणी आलें, तर बिचाऱ्या नाभिकाच्या श्रमावर पाणीच पडेल ! यासाठीं नाभिकानें आधीं आपल्या हाता-बोटाच्या लवचिकपणाला सांभाळलें पाहिजे. हाताबोटांचा लवचिकपणा नि मनगटाचा नरमपणा नसेल, तर नाभिककलेंतील इतर ज्ञान असूनहि त्याचा फारसा उपयोग होणार नाहीं. यासाठीं हात एखाद्या कशिदा काढणाऱ्याच्या हातासारखे असणें हा उत्तम दाढी करतां येण्याचा मूलमंत्र आहे.

## दाढी करणें : साबण लावणें.

दाढी करविण्यासाठीं गिऱ्हाईक दुकानांत आलें कीं, नाभिकानें एखाद्या सैनिकाप्रमाणें शिस्तींत अदबीनें उभें राहावें. आरशासमोर असलेली खुर्ची जराशी मागें ओढून गिऱ्हाईकाला नीट बसतां येईल असें करावें; व आपण खुर्चीच्या उजव्या बाजूस राहावें. नंतर पूर्वतयारीसाठीं सांगितलेल्या नं. १, २ व ३ ह्या गोष्टी क्रमानें करून दाढीला साबण लावावा.

दाढीला साबण लावण्यापूर्वीं दाढीचा ब्रश गरम पाण्यांत घालून काढवा. स्वतःचे हात स्वच्छ धुवावे. साबणाचा फेंस काढण्यासाठीं शक्यतों गरम पाण्याचाच उपयोग करणें बरें. फेंस भरपूर काढला कीं दाढीच्या ब्रशानें तो फेंस चेहेऱ्यावर लावायला सुरवात करावी. साबणाचा

फेंस गिऱ्हाईकांच्या दाढीला लावायला सुरवात करतांना, प्रथम उजव्या जबड्याच्या खालीं मानेला फेंस लावावा व मग हळूहळू दाढी करावयाचा तेवढा भाग दाट फेंसानें आच्छादावा फेंस लावतांना हात उगीच आडवा उभा न फिरवतां वर्तुळाकृति गतीनें फिरवावा, म्हणजे साबणाचा फेंस केंसांच्या मुळांपर्यंत जाऊं शकेल.

तसेंच दाढीचा ब्रशहि योग्य रीतीनें हातांत धरावा. योग्य रीतीनें याचा अर्थ असा कीं, ब्रशाचा तळ आपल्या उजव्या हाताच्या तळव्याला लागेल अशा बेतानें ब्रश हातांत धरावा व बोटांनीं ब्रशाच्या केंसाचीं मुळें पकडावीं. अशा रीतीनें ब्रश हातांत धरून फेंस दाढीला लावला कीं ती व्यवस्थित फेंस लावण्याची तऱ्हा झाली असें समजावें.

**साबण कां लावतात ?**

दाढी करतांना वस्तरा चालविण्यापूर्वी साबणाचा दाट फेस कां लावतात हेंहि नाभिकानें समजावून घेतलें पाहिजे. साबणाचा फेंस मुख्यतः चार कारणांसाठीं लावतात.

( १ ) फेंसामुळें केंस ताठ उभे राहायला मदत होते. केंस फेंसाच्या आधारानें उभे राहिल्यामुळें वस्तऱ्याच्या धारेनें अगदीं त्वचेच्या पातळीबरोबर कापणें सोपें जातें.

( २ ) त्वचेचा जो एक प्रकारचा नैसर्गिक तेलकटपणा असतो, तो साबणाच्या फेंसामुळें नाहींसा होतो.

( ३ ) वस्तरा त्वचेवर फिरवायला जो सुळसुळीत-गुळगुळीतपणा असावा लागतो, तो फेंसानें निर्माण होतो.

( ४ ) फेंसानें केंस नरम होतात.

वरील चार कारणांसाठीं दाढी करतांना साबणाचा फेंस लावायचा असल्यामुळें, तो वर म्हटल्याप्रमाणें वर्तुळाकार गतीनें सुमारें दोन-तीन मिनिटें तरी लावला पाहिजे.

अशा रीतीनें फेंस चांगला भरपूर लावल्यावर, मग (ज्या ठिकाणीं तशी सोय असेल तिथें) वाफयुक्त टॉवेलानें साबण लावलेला दाढी करायचा भाग लपेटावा. वाफयुक्त टॉवेलाचीहि केंसाचा बाह्य भाग नरम व्हायला मदत होते. जिथें वाफयुक्त टॉवेल वापरायची पद्धत नसेल, तिथें फक्त साबणाचा फेंसहि पुरेसा असतो.

वाफयुक्त टॉवेल थंड झाला कीं तो टॉवेल व फेंस काढावा. आणि परत एकदां फेंस लावावा. एवढें झाल्यावर दाढी करायची खरी सिद्धता होते आणि एवढें झाल्यावरच मग वस्तऱ्याचा उपयोग करायची वेळ येते.

वस्तऱ्याचा उपयोग करतां येणें ही कांहीं मामुली गोष्ट नव्हे. गिऱ्हाईकाला त्रास न होतां जो वस्तऱ्याचा उपयोग करील आणि अगदीं तुळतुळीत गुळगुळीत दाढी करील तोच खरा कारागीर नाभिक होय. यासाठीं वस्तरा चालवायचें तंत्र आत्मसात करणें जरूर आहे. पुढील प्रकरणांत त्याच तंत्राची माहिती दिली आहे.

———

## : ४ :

## वस्तरा चालविण्याचें तंत्र

वस्तऱ्याचा उपयोग करतांना तो हातांत कसा धरावा इथपासून विचार करायला हवा. वस्तरा कितीहि चांगल्या धारेचा असला, कितीहि भारी किंमतीचा असला, पण तो कसा हातांत धरावा हेंच माहीत नसलें, तर बिचाऱ्या गिऱ्हाईकाचे गाल रक्तबंबाळच व्हायचे ! यासाठीं दाढी व्यवस्थित पद्धतीनें करतां येण्यासाठीं वस्तरा नीट हातांत धरतां येणें अत्यंत अगत्याचें आहे. वस्तरा पुढीलप्रमाणें हातांत धरण्याची संवय करावी.

(१) वस्तऱ्याचें वजन बहुतेक बोटांवर पडेल, अशा बेतानें वस्तरा धरावा.

(२) आंगठा वस्तऱ्याच्या टांचेजवळ पात्यावर ठेवावा.

( ३ ) पात्यावर आंगठ्याचा भार प्रमाणाबाहेर घालूं नये किंवा आंगठ्यानें पातें अवास्तव दाबूं नये.

( ४ ) वस्तरा खालीं ओढतांना, आंगठ्यानें पात्याची सुमारें १ इंच जागा व्यापेल अशा रितीनें पात्यावर क्र. २ मध्यें सांगितल्याप्रमाणे आंगठा ठेवावा.

## दाढी करतांना वस्तरा चालवायच्या पद्धति

समजा वस्तरा वर सांगितल्याप्रमाणें योग्य रीतीनें धरतां आला. पण पुढें प्रश्न असा उत्पन्न होतो, कीं दाढी करतांना वस्तरा कसा चालवायचा ? त्या चालविण्याला कांहीं दिशा आहेत का ? प्रथम कुठें सुरवात करायची ? का मनाला वाटेल तिथें प्रथम वस्तरा फिरवायला लागायचें ?

हे प्रश्न अत्यंत महत्त्वाचे आहेत. आणि त्या प्रश्नांचीं उत्तरेंहि अत्यंत महत्त्वाचीं आहेत. तीं अशीं: वस्तरा चालवायच्या कांहीं विशिष्ट दिशा आहेत. विशिष्ट पद्धति आहेत. आणि विशिष्ट जागाहि आहेत.

दाढी करतांना वस्तरा दाढीच्या कोणत्याहि भागावर प्रथम चालवून भागत नाहीं. प्रथम गिऱ्हाईकाच्या उजव्या बाजूला, कानाच्या पाळीच्या दरम्यान वस्तरा चालवायला सुरवात करावी. आणि मग क्रमाक्रमानें सबंध दाढी तासावी. वस्तरा चालविण्याच्या मुख्यतः ४ पद्धति किंवा प्रकार आहेत.

( १ ) पहिली पद्धत म्हणजे **मोकळा हात** ( Free hand ) आकृति नं. १३

( २ ) दुसरी पद्धत म्हणजे **मागचा हात** ( Back hand ) आकृति नं. १४

(३) तिसरी पद्धत **उलट्या मोकळ्या हाताची.** (Reverse free hand) आकृति नं. १५

(४) आणि चवथी पद्धत म्हणजे **उलट्या मागच्या हाताची.** (Reverse back hand) आकृति नं. १६

ह्या चार पद्धतींपैकीं तिसऱ्या पद्धतींत पहिल्या पद्धतीप्रमाणेंच वस्तरा हातांत धरायचा असतो; परंतु फरक एवढाच कीं, हात खालच्या बाजूस कललेला असतो आणि वस्तऱ्याच्या धारेची बाजू वरच्या दिशेकडे असते. त्याचप्रमाणें तशा पद्धतीनें वस्तरा चालवितांना मनगटाला जराशी मुरड घालावी लागते आणि त्यामुळें पात्यानें वक्रगति घेतली जाते.

चवथी तऱ्हा, केंस कापतांना बाह्यरेषा तयार करण्यासाठीं उपयोगांत आणायची असते. गळ्याची डावी बाजू व कानामागील केंस काढण्यासाठीं ही तऱ्हा उपयोगी असते.

## वस्तरा चालवायच्या दिशा

वस्तरा कसा चालवावा यासंबंधानें ज्या मुख्यतः चार पद्धति आहेत. त्या वर दिलेल्या आहेत. परंतु दाढी करतांना ह्या पद्धतींचा जरुरीप्रमाणें सरमिसळ उपयोग करायचा असतो. आतां वस्तरा चालविण्याच्या ज्या दिशा आहेत, त्या आ. नं. १७ मध्यें दाखविलेल्या आहेत. दाढी करतांना त्या त्या दिशेनें वस्तरा चालविला तर दाढी करणें सोपें जातें. त्याचप्रमाणें त्या त्या दिशेनें वस्तरा फिरवितांना कोणत्या पद्धतीनें वस्तरा धरावा याचीहि माहिती आकृतींच्या खालींच दिलेली आहे. त्याचप्रमाणें गिऱ्हाईकाच्या उजव्या बाजूला वस्तरा चालवायच्या दिशा व डाव्या बाजूला वस्तरा चालवायच्या दिशा यांच्याहि दोन स्वतंत्र आकृति

काढून स्पष्टिकरण केलेलें आहे. ( आकृ. नं. १८ व १९ पहा ) शिकाऊ नाभिकानें वस्तरा चालविण्याच्या त्या त्या दिशा व वस्तरा धरण्याच्या पद्धति यांचा सूक्ष्म अभ्यास करणें जरूर आहे. दाढी करतांना गिऱ्हाईकाच्या उजव्या बाजूनें प्रथम सुरवात करावी असें मागें म्हट-




आकृति नं. १७

दाढीचे १४ पट्टे त्या त्या पट्ट्यांत वस्तरा धरायच्या पद्धति, आणि वस्तरा चालवायच्या क्रमवार दिशा.

१. मोकळा हात. २. मागचा हात. ३. मोकळा हात. ४. मोकळा हात. ५. उलटा मोकळा हात. ६. मागचा हात. ७. मागचा हात ८. मोकळा हात. ९. मागचा हात. १०. उलटा मोकळा हात. ११. मोकळा हात. १२. मोकळा हात. १३. उलटा मोकळा हात. १४. उलटा मोकळा हात.

लेलेंच आहे. वस्तरा रीतसर धरायच्या पद्धतींचा अभ्यास करणें व वस्तरा चालवायच्या क्रमवार दिशा लक्षांत ठेवणें हेंच दाढी करण्याचें मुख्य तंत्र आहे. ह्या तंत्राचा जसाजसा योग्य उपयोग करतां येईल, तसतशी केस-भूषाकला अधिकाधिक आवाक्यांत येईल.

वरील पद्धतीनें वस्तरा धरून तो योग्य त्या त्या दिशेनें चालविण्याची अधिक स्पष्ट व क्रमवार माहिती पुढीलप्रमाणें आहे.

१. **सुरवातः** ( आ. नं. १८ पहा ) मोकळा हात ह्या पद्धतीनें वस्तरा




चालवीत असतांना गिऱ्हाईकाच्या उजव्या कानाजवळील केंसावरील साबणाचा फेंस डाव्या हाताच्या तर्जनीनें ( आंगठ्या

जवळील बोटानें ) काढून टाकावा; आणि गिऱ्हाईकाचा चेहरा आस्ते आस्ते व अलगपणें डाव्या बाजूस फिरवावा.

२. वस्तऱ्याला लागलेला साबण पुसून टाकावा, आणि नं. २ च्या पद्धतीनें वस्तरा धरून दाढी तासावी.

३. परत वस्तरा पुसून नं. ३ च्या पद्धतीनें वस्तरा धरावा व उजव्या बाजूच्या वरच्या ओठावर वस्तरा फिरवावा.

४. आतां वस्तरा पुसण्याची गरज नाहीं. नं. ४ पद्धतीनें वस्तरा धरून जबड्याची खालची बाजू तासावी. मात्र केसांचें वळण जिथें बदलतें तिथपर्यंतच ह्या पद्धतीनें ताशीत यावें. कारण जबड्याच्या खालीं कांहीं अंतरावर केसांची दिशा बदलून उर्ध्वगामी ( वरच्या दिशेस जाणारी ) होते.

५. खुर्चीच्या मागच्या बाजूस जाऊन, उलट्या मोकळ्या हातानें वस्तरा धरून, गळयाच्या उजव्या बाजूकडील खालचा भाग खालून वर अशा दिशेनें तासावा. येथपर्यंत चेहऱ्याची उजवी बाजू साफ होईल.

६. इथून डाव्या बाजूची दाढी करायला सुरवात होते. ( आ. नं. १९ पहा ) इथें तिसऱ्यांदा वस्तरा पुसून साफ करावा व पट्यावर सपासप फिरवून पाजळावा. गिऱ्हाईकाच्या उजव्या बाजूस राहून त्याच्या डाव्या बाजूच्या वरच्या ओठावर वस्तरा फिरवावा. ह्या वेळीं ‘ मागचा हात ’ ही वस्तरा धरण्याची तऱ्हा असावी. डाव्या हातानें गिऱ्हाईकाच्या नाकाची कळी त्याच्या उजव्या बाजूकडे कलती धरून ठेवावी.

७. गिऱ्हाईकाचा चेहरा त्याच्या उजव्या बाजूस वळवावा. चेहऱ्याच्या डाव्या बाजूला परत फेंस लावावा. डाव्या कानाजवळील केंसांच्या



१९

मर्यादेकडील फेंस बोटानें काढून टाकावा, आणि 'मागचा हात' पद्धतीनें वस्तरा धरून काम करूं लागावे. स्वतः गिऱ्हाईकाच्या किंचित् मागच्या बाजूस राहून दाढी करावी.

८. पुन्हा गिऱ्हाईकाच्या उजव्या बाजूस यावें. वस्तऱ्याचा फेंस काढून टाकावा. आणि मोकळ्या हातानें गिऱ्हाईकाच्या डाव्या गालावरून हनुवटीपर्यंत वस्तरा चालवावा.

९. वस्तऱ्याचा फेंस परत पुसून टाकावा. गिऱ्हाईकाच्या अगदीं उजव्या बाजूस राहावें आणि मागच्या हातानें ९ व्या पट्ट्यांतील

दिशेनें वस्तरा चालवावा. म्हणजे गिऱ्हाईकाच्या डाव्या बाजूच्या जबड्याच्या खालील भाग स्वच्छ होईल.

१०. वस्तरा पुसून स्वच्छ करावा. गिऱ्हाईकाच्या किंचित् मागच्या बाजूस रहावें. आणि उलटा मोकळा हात पद्धतीनें वस्तरा धरून, खालून वर अशा दिशेनें गळ्याच्या डाव्या बाजूला वस्तरा चालवावा.

११. नंतर गिऱ्हाईकाच्या उजव्याच बाजूला राहावें, पण किंचित् पुढें यावें आणि डावीकडून उजवीकडे ह्या दिशेनें हनुवटीचा भाग साफ करावा. वस्तरा धरायची पद्धत मोकळा हात.

१२. आतां हनुवटीचा खालचा भाग साफ करायची वेळ येते. ह्या वेळीं मोकळ्या हातानें वस्तरा धरून तो साफ करावा. मात्र जिथें केसांचें वळण बदललेलें असेल, तिथपर्यंतच तेवढ्या पट्ट्यावर तशा रीतीनें वस्तरा फिरवावा. ( आ. नं १७ मधील १२ वा पट्टा पहा )

१३. ह्या वेळीं खुर्चीच्या मागच्या बाजूस आपण रहावें. मग ‘ उलटा मोकळा हात ’ पद्धतीनें वस्तरा धरून गळ्याचा खालचा भाग साफ करावा. ह्या वेळीं वस्तरा फिरवायची दिशा खालून वर अशी असावी.

१४ दाढी करण्याची ही शेवटची अवस्था आहे. इथें ‘ उलटा मोकळा हात ’ पद्धतींत दाखविल्याप्रमाणें वस्तरा हातांत धरावा. खालच्या ओठाखालील भाग (आ. नं. १७ मधील नं. १४ पहा) साफ करावा.

वरीलप्रमाणें चेहऱ्यावरील १४ हि पट्टे साफ केल्यावर दाढी

करण्याच्या क्रियेंतील प्रथमावस्था पूर्णपणें संपली असें समजावें. मग गिऱ्हाईकाच्या इच्छेप्रमाणें वाटल्यास दाढीच्या केंसांच्या विरुद्ध दिशेनें म्हणजे उलट वस्तरा फिरवून दाढी करावी, किंवा प्रथमावस्थेप्रमाणें परत एकदां तशीच पहिल्याप्रमाणें सरळ पद्धतीनें दाढी करावी.

मात्र दाढी करण्याची प्रथमावस्था संपवून दुसरी आवृत्ति सुरू करतांना वस्तऱ्याचा फेंस काढून टाकावा. परत एकदां वस्तरा पाजळण्यासाठीं फिरवावा आणि परत एकदां साबणाचा फेंस दाढीला लावून दाढी करावी. मात्र गिऱ्हाईकाची इच्छा असल्याशिवाय उलट दाढी करूं नये. ( केंसांच्या वळणाच्या विरुद्ध दिशेनें वस्तरा फिरवू नये. ) दुसऱ्या वेळीं, म्हणजे दाढी करण्याच्या क्रियेची पुनरावृत्ति करतांना, फक्त 'मोकळा हात' व 'उलटा मोकळा हात' ह्या पद्धतीनें वस्तरा धरावा.

नंतर चेहऱ्यावर स्वच्छ पाण्याच्या फवाऱ्यानें पाणीं शिंपडून तें नरम टॉवेलानें अलगत टिपून–पुसून काढावें. मात्र अशा रीतीनें पाणी पुसून काढतांना आधीं चेहऱ्याचा खालचा भाग पुसायला सुरवात करावी व नंतर वरचा भाग पुसून काढावा. चेहरा पूर्णपणें कोरडा झाल्यावर थोडीशी क्रीम ( पॉण्डसारखी ) घेऊन ती दाढी केलेल्या भागावर थोडीथोडी लावावी व आपण खुर्चीच्या मागच्या बाजूस जाऊन दोन्ही हाताच्या मांसल बोटांनीं ती क्रीम हलके हलके चेहऱ्याच्या कातडीवर चोळावी. नंतर नरमशा टावेलवर थोडीशी टालकम पावडर टाकून सर्वत्र सारखी लावावी. पावडरपफनें पावडर लावली तरीहि चालेल. मग गिऱ्हाईकाच्या गळ्याखालीं घातलेला छोटा टॉवेल काढावा. आणि खुर्चीच्या मागच्या बाजूस राहूनच, गिऱ्हाईकाच्या मर्जीप्रमाणें त्याला आवडतील अशा रीतीनें त्याचे केंस

विंचरावे. केंस विंचरतांना जर एखादें तेल अगर पोमेड अगर हेअरक्रीम लावायचीच असेल तर ती गिऱ्हाईच्या संमतीनेंच लावावी. कारण कित्येक लोक आपल्या केंसांना कधींच कसला तेलकट पदार्थ लावीत नाहींत. कित्येकांना तर फक्त पाण्याचे चार थेंब टाकूनच केंस विंचरणें आवडतें. यासाठीं आपल्या आवडीनिवडी गिऱ्हाईकाच्या माथीं मारण्याचा कधींच प्रयत्न करूं नये. सर्व कांहीं त्याच्याच मर्जीप्रमाणें व पसंतीप्रमाणें होऊं द्यावें.

केंस विंचरून झाल्यावर, गळ्याच्या बाजूला पडलेलीं केंसांचीं खुंटणें वगैरे ब्रशानें झाडून टाकावीं. आणि इतकें झाल्यावर गिऱ्हाईकाला गुंडाळलेली चादर काढून घ्यावी.

## त्वचा ताणणें

दाढी करतांना डाव्या हाताच्या बोटांनीं त्वचा ताणून वस्तरा चालवावा लागतो. त्वचा दोन प्रकारें ताणतां येते. वरच्या बाजूनें त्वचा ताणून धरून वस्तरा खालीं ओढणें हा त्वचा ताणण्याचा एक प्रकार असून, दुसऱ्या प्रकारांत, ज्या दिशेनें वस्तरा ओढला जातो त्याच दिशेनें त्वचा ताणून धरतात. उदाहरणार्थ, वस्तरा वरून खालीं ओढायचा असेल, तर खालच्या बाजूनेंच त्वचा ताणून धरतात. परंतु कोणत्या रीतीनें त्वचा ताणून धरावी, याचा नक्की नियम असा नाहीं. जसें सोईस्कर पडेल तसें करावें. मात्र त्वचा ताणून धरतां यावी, म्हणून डाव्या हातांचीं बोटें चांगलीं कोरडीं असणें अत्यंत आवश्यक असतें.

## दाढी करतांना विचारांत घ्यावयाच्या गोष्टी

दाढी करण्याच्या तंत्रांत पुढील गोष्टी अवश्य ध्यानांत ठेवल्या पाहिजेत.

(१) केंस वाढण्याची दिशा आणि केंसांचें वळण पाहून वस्तरा फिरविणें.

(२) केंसांचा दाट विरळपणा व राठ-नरमपणा लक्षांत घेऊन वस्तरा फिरविण्याची दिशा ठरविणें.

(३) फेंस गिऱ्हाईकाच्या चेहऱ्यावर वाटेल तसा न चोपडतां, ठराविक भागावरच परंतु भरपूर प्रमाणांत योग्य रीतीनें व योग्य गतीनें लावणें.

(४) त्वचा ताणून धरतां यावी म्हणून डाव्या हाताचीं बोटें कोरडीं राखणें.

(५) वाफयुक्त टॉवेल लावतांना त्वचेचा नाजुकपणा लक्षांत घेणें. त्वचा फार नाजुक असेल अगर त्वचेला भेगा पडलेल्या असतील किंवा पुळ्या आलेल्या असतील, तर वाफयुक्त टॉवेल चेहऱ्याला गुंडाळूं नये हेंच उत्तम.

(६) दाढी करतांना, खालच्या ओठाकडचा भाग, गळ्याचा खालचा भाग, आणि कित्येकांना गळ्याकडे असलेला बांकदार हरडा, ह्या भागांवरून वस्तरा फिरवतांना अत्यंत खबरदारी घ्यावी. कारण ते भाग अत्यंत संवेदनाक्षम असून नाजुक असतात. जास्त जोरानें किंवा त्वचेच्या पृष्ठभागास अगदीं खरडून दाढी तासल्यास त्या त्या भागांना इजा होण्याचा संभव असतो.

## वस्तरा लागला तर

दाढी करतांना वस्तरा लागून रक्त आल्यास लगेच त्यावर तुरटीचा गुळगुळीत तुकडा चोळावा किंवा स्टिपटिक पावडर ( Styptic

powder ) नरम स्वच्छ कापसानें घेऊन, त्या बोळ्यानें रक्त हळूच पुसून काढावें. थंड पाणी किंवा बर्फ चोळूनहि रक्तप्रवाह थांबवितां येतो. त्याच प्रमाणें कधीं कधीं हैड्रोजन पेरॉक्साईड ( Hydrogen peroxide ) सुद्धां लावतात.

दाढी करण्याच्या तंत्रासंबंधानें जरूर तेवढी सर्व माहिती संक्षिप्तपणें ह्या प्रकरणांत दिल्यानंतर पुढील प्रकरणांत केशकर्तन कलेचा विचार करूं.



: ५ :

## केशकर्तनकला व तंत्र.

केशकर्तनाची कला वरवर पाहाणाऱ्याला जितकी सोपी वाटते, तितकी ती सोपी खास नाहीं. ही कला शिकतांना पुस्तकी ज्ञानापेक्षां प्रत्यक्ष कृतीची व अनुभवाचीच अधिक जरूरी आहे, हें नवशिक्या केशकर्तनकारानें पक्कें लक्षांत ठेवावें. "गुरुवांचून विद्या व्यर्थ" हें तत्त्व केशकर्तनकलेला पूर्णांशानें लागू पडतें म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. कारण ही कला शिकतांना अनुभवी नाभिकाच्या साहाय्याची अत्यंत गरज असते. जसजसा सराव वाढेल, अनुभव येईल, तसतसा हात तयार होईल आणि कारागिरी निर्दोष बनेल.

### केशकर्तनाच्या पध्दति

केशकर्तनाच्या मुख्यतः पांच पद्धति आहेत, त्या अशाः—

१ फणी–कात्रीनें केंस कापणें.

२ फणी–कात्री आणि मशीन ( Clipper ) यांच्या साह्याने केंस कापणें.

३ फणी आणि मशीन यांनीं केंस कापणें.

४ वस्तऱ्यानें केंस कापणें.

५ संपूर्णतः अगर अंशतः केंस कापणीचें काम इलेक्ट्रीक मशीननें करणें.

केशकर्तन क्रियेंतील साधनसामुग्रीच्या दृष्टीनें जशा ह्या पांच पद्धति आहेत, तशा गिऱ्हाईकाच्या केशभूषेच्या दृष्टीनेंहि कांहीं केशरचनाविषयक प्रकार आहेत. हे प्रकार मुख्यतः एकंदर सहा असून ते खालीं दिले आहेत.

१ मध्यें अगर बाजूला भाग पाडलेले केंस आखूड कापणें. ( Short cut )

२ ,, ,, ,, ,, ,, ,, मध्यम कापणें. ( Medium )

३. ,, ,, ,, ,, ,, ,, लांब कापणें. ( Long cut or trim )

४. भांग न पाडतां उलट फिरविलेले केंस आखूड कापणें. ( Short pomp. )

५. उलट फिरविलेले केंस मध्यम कापणें. Medium pompadour. (कदाचित् भांग पाडलेलाहि असेल.)

६. उलट फिरविलेले केंस लांब कापणें. ( Long pompadour. ) ( कदाचित् भांग पाडलेलाहि असेल. )

## केशकर्तनाची गुरुकिल्ली

केशकर्तनांत उत्कृष्ट कारागिरी साधण्यासाठीं फणी आणि कातरी योग्य रीतीनें धरून, दोन्ही हात प्रमाणशीर उपयोगांत आणून, त्या हत्यारांचा उपयोग करतां येणें, ही केशकर्तनाची खरी गुरुकिल्ली आहे. सरावानें व अनुभवानें ही कारागिरी हस्तगत करतां येते असें मागें म्हटलेंच आहे, पण नवशिक्या केशकर्तनकारासाठीं इथें मी कांहीं व्यावहारिक सूचना देऊन ठेवणार आहें. त्या सूचना अशा कीं, गिऱ्हाईक दुकानांत येऊन खुर्चीवर बसल्यावर व चादर वगैरे घालून झाल्यावर शक्यतों स्प्रिंगची कातरी व फणी यांचा उपयोग करूनच केशकर्तन करावें. कारण स्प्रिंगच्या कातरीनें केंसांना खापें पडण्याची भीति कमी असते. कारण कातरीनें कचदिशीं केंस कापले जातात, तसे स्प्रिंगच्या कातरीनें कापले जात नाहींत. शिवाय त्या कातरीची रचनाच अशी असते कीं, त्या कातरीचा पुढचा रुंदट भाग हळुहळू प्रमाणांत वरवर उचलत केंसकापणीला नितळपणा (प्रमाणशीर चढउतारपणा) आणणें सोपें असतें. साध्या हातकातरीनें तसें करणें अत्यंत कठीण असतें. इतकेंच नव्हे तर, जर एखाद्या नवशिक्या नाभिकानें साध्या कातरीनें केंस कापायला सुरवात केली, तर त्याला गिऱ्हाईकाच्या पसंतीप्रमाणें ठराविक प्रमाणांत आंखूड अगर लांब केंस कापणें शक्य होत नाहीं. कारण कात्रीच्या छाटणीनें एखादी छाटणी योग्य बसते, तर एखाद्या छाटणीनें खोल खाप पडते. अर्थात् केंसांत जो उंचसखलपणा निर्माण होतो, तो नाहींसा करून केंसांची पातळी नितळ करण्यासाठीं बऱ्याच छाटण्या माराव्या लागतात, आणि असें करतां करतां, मध्यम केंस कापायच्या इराद्यानें काम सुरू केलेलें असलें, तरी केंसांची पातळी साधतां साधतां

केंस अगदीं बारीक कापले जातात. इतकेंहि करून केंसांच्या चढउतारपणांत नितळपणा आला नाहीं, तर फजितीला पारावार उरत नाहीं ! गिऱ्हाईक नाखूष होऊन, त्या दुकानाला कायमचा रामराम ठोकील तें निराळेंच ! ! म्हणून, सावधगिरी बाळगून, स्प्रिंगची कातरी वापरून सुरवातीला केशकर्तन करणें बरें. निदान कानांजवळचा दर्शनी भाग व मागील बाजूचा मानेजवळचा भाग—ह्या भागांवरील केंस स्प्रिंगच्या कातरीनें कापूनच केंसांना निमूळती व नितळ उतरण आणावी. केंस कापतांना आणखी एक गोष्ट मुद्दाम लक्षांत ठेवणें जरूर आहे ती ही कीं, कात्री उजव्या हातांत असल्यामुळें, ज्याचे केंस कापावयाचे तें गिऱ्हाईक आपल्या उजव्या बाजूला असेल किंवा समोर येईल अशा रीतीनें स्वतः उभें रहावें. तसेंच गिऱ्हाईकाच्या बैठकीचें प्रमाणहि असें ठेवावें कीं, केंस कापतांना आपणांस वांकावें लागूं नये, अगर पाय दुमडावे लागूं नयेत, किंवा उगीच वांकडें तिकडें उभें राहाण्याची पाळी येऊं नये. आपल्याला अगदीं सहज म्हणजे अडचणी वांचून काम करतां येईल, अशा बेतानें गिऱ्हाईकाची बैठक उंच अगर सखल करून मगच केशकर्तन क्रियेला सुरवात करावी. साधी कातरी वापरतांना कातरीच्या एका मुठींत आंगठा घालून दुसऱ्या मुठींत हाताचें तिसरें बोट घालावें.

मात्र केंस कापायला सुरवात करायच्या आधीं मानेच्या मागच्या बाजूला पण खालच्या भागावरील केंसावर थोडीशी टालकम पावडर मारावी. त्यामुळें कापलेल्या केंसांचे लहान लहान तुकडे मानेच्या त्वचेला चिकटून राहणार नाहींत हा एक फायदा, आणि दुसरें असें कीं,

स्प्रिंगची कात्री खालून वर चालवितांना तिच्या गतीला अडथळा होत नाहीं.

## केंस कापणीचीं हत्यारें हाताळण्याचें तंत्र




१ केंसांची पद्धतशीर उतरणी साधण्यासाठीं स्प्रिंगची कात्री धरण्याची योग्य पद्धत. (आ. नं. २० )

२ फणी—कात्रीनें केंस कापतांना, फणी व कात्री हातांत धरण्याची खरी पद्धत. ( आ. नं. २१ )

३. इलेक्ट्रिक कातरीनें ( मशीननें ) केंस कापतांना ती कात्री व फणी धरण्याची रास्त पद्धत. ( आ. नं. २२ )



४. केंस स्प्रिंगच्या कात्रीनें (मशीननें) कापतांना केंसांची रीतसर व जरूर ती उतरण साधण्यासाठीं कात्रीचा वरचा भाग हळुहळू कसा वर उचलीत जावा याची आकृति. ( आ. नं. २३ )

२३

## स्प्रिंगच्या कातरीनें ( मशीननें ) केंस कापणें

ज्या केशभूषापद्धतीला स्प्रिंगच्या कातरीनें डोक्याच्या सभोंवारचे केंस कापण्याची जरूरी असेल, तेव्हां केंसकापणीची सुरवात गिऱ्हाईकाच्या डाव्या बाजूकडील भागापासून करावी आणि डोक्याच्या सभोंवतालचे केंस कापीत कापीत उजव्या बाजूकडील भागापर्यंत आणून संपवावी.

मानेच्या मागील बाजूकडील केंस स्प्रिंगच्या कात्रीनें कापायचे असतील, तेव्हां मानेच्या डाव्याबाजूला सुरवात करून उजव्या बाजूला शेवट करावा.

## फणीकात्रीचें काम

स्प्रिंगच्या कात्रीनें कापलेल्या केंसांची कडा प्रमाणशीर मिळवून घेण्यासाठीं जी साध्या कातरीनें व फणीच्या साहाय्यानें कापणी करायची असते, तेव्हां आ. नं. २४ मध्यें दाखविल्याप्रमाणें यथायोग्य कातरी व फणी धरावी. अशा वेळीं फणीचा दाट दातांचा भाग उपयोगांत आणावा.

डोक्यामागील उंचवट्यावरील केंस साध्या कातरीनें कापतांना फणीचा विरळ दातांचा भाग वापरावा.

फणीचा दाट दातांचा भाग उपयोगांत आणून कानावरील भागाचे केंस साध्या कातरीनें कसे कापावे तें आ. नं. २५ मध्यें दाखविलें आहे. त्याचप्रमाणें मानेवरील केंसांची व कानाकडील पुढील बाजूची बाह्य रेखणी कशी करावी तें आ. नं. २६ व २७ मध्यें दाखविलेलें आहे.



२६




## केंसकापणींत बोटांचा उपयोग

साध्या कातरीनें कापणी केल्यानंतर कांहीं ठिकाणीं केंस लांब राहिलेले आढळतात व ते आंखूड करणें जरूर असतें. अशा वेळीं केंसांचा नेमका तेवढाच भाग फणीनें उचलून बोटांत धरावा लागतो व कापून टाकावा लागतो. ही बोटांनीं केंस धरून कापण्याची पद्धत पुढील प्रमाणें असते.

गिऱ्हाईकाच्या डाव्या बाजूकडील केंस बोटांत धरून कापायचे असतील तेव्हां गिऱ्हाईकाच्या समोर उभें राहावें. फणी कातरी उजव्या हातांत धरावी. मग ते केंस कपाळपट्टीच्या डाव्या कोपऱ्यापासून ( कानशिलाजवळून ) डोक्याच्या मागील उंचवट्यापर्यंत उजव्या हातांतील फणीनें

मागें रेटीत विंचरून फणीनें अशा रीतीनें थोडेसे वर उचलावे कीं, डाव्या हाताचीं दोन बोटें ( तर्जनी व मध्यमा ) त्या केंसाखालीं सहज घालतां येऊन त्या बोटांत ते केंस धरून कातरीनें कापतां येतील. केंस कापतांना अर्थात् उजव्या हातांतील फणी डाव्या हाताचा आंगठा व तर्जनी यामध्यें पकडावी. बोटानीं केंस कसे धरावे व त्या वेळीं डाव्या हातांत फणी पकडून बोटांतील केंस कसे कापावे तें आ. नं. २८ वरून कळून येईल

अशा रीतीनें पहिली कात्री मारल्याबरोबर केंस सोडूं नयेत. डाव्या हातांतली फणी उजव्या हातानें, बोटांनीं धरलेल्या केंसाखालीं घालावी व मग बोटें सोडून फणी आणखी पुढें ढकलून जराशी वर उचलून परत पूर्वींप्रमाणेंच ते केंस डाव्या हाताच्या दोन बोटांत धरावे व परत फणी



२८

पूर्ववत् डाव्या हाताच्या बोटांत पकडून ते केंस कापावे. अशा रीतीनें फणीकात्रीचें काम डोक्याच्या मागील उंचवटयापर्यंत पोंचेंपर्यंत चालू ठेवावें. साधारणपणें असें चार वेळ करावें लागतें. कपाळपट्टीच्या कोपऱ्यापासून सुरवात करून, प्रत्येक वेळेला जरा वरच्या भागावरील केस उचलून कापीत कापीत डोक्याच्या मागील उंचवटयापर्यंत जावें. ( आ. नं. २९ पहा. )

जेव्हां गिऱ्हाईकाच्या उजव्या बाजूकडील केस कापायचे असतील, तेव्हां आपण गिऱ्हाईकाच्या मागें उभें राहून, केंस आपल्या बाजूला विंचरून घ्यावे व मग वरीलप्रमाणें बोटांत केंस धरून कापावे. ( आ. नं. ३० पहा. )

## पुढची बाह्य रेखणी

पुढच्या बाजूच्या केंसांची बाह्य रेखणी करतांना एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं, जर डाव्या बाजूला भांग पाडायचा असेल तर सगळे केंस उजव्या बाजूला वळवून विंचरावे; आणि अशा रीतीनें कपाळपट्टीच्या कोपऱ्याकडे केंस खालीं लोंबू लागले कीं आ. नं. ३१ प्रमाणें ते केंस कापावे. ह्यावेळीं केंस विंचरतांना फणीचा विरळ दांताचा भाग उपयोगांत आणावा, आणि त्याच भागानें केंस धरून ठेवावे. म्हणजे ते कात्रीनें सहज कापतां येतील.

जर उजव्या बाजूला भांग पाडायचा असेल तर सगळे केंस डाव्या बाजूला परतून घ्यावे व वरील प्रमाणेंच फणीचा भाग उपयोगांत आणून ते कापावे. ( आ. नं. ३२ पहा )

केंस उलटे फिरवायचे असतील अगर मध्यें भांग पाडायचा असेल, तेव्हां उजवी आणि डावी—दोन्ही बाह्यरेखणी करावी. ही बाह्यरेखणी करतांना केशभूषेची पद्धत लक्षांत घेऊन, ( आंखूड, मध्यम अगर लांब जशी असेल त्याप्रमाणें ) गिऱ्हाईकाच्या पसंतीप्रमाणें केंसाचीं टोकें छाटावीं.

## कानाजवळची व मानेवरील केंसांची रेखणी

केंसकापणी संपल्यावर कानाच्या पुढची, वरची व मागची मानेवरची रेखणी वस्तऱ्यानें करायची असते. ती रेखणी करण्याची रीत पुढील-प्रमाणें आहे.

केंसकापणी झाल्याबरोबर चादर काढून घ्यावी. मानेवरचे व चेहऱ्या-वरचे वगैरे ( कापून पडलेले ) केंस केंस-झाडणीनें झाडून टाकावेत, मग स्वच्छ टॉवेल गिऱ्हाईकाच्या गळ्याभोंवतीं घालावा. ( दाढी करतांना घालतात तसा. ) स्वतःचे हातहि स्वच्छ धुवावे. थोडासासा साबणाचा फेस कानाजवळील पुढच्या व मागच्या भागाला आणि मानेच्या मागच्या भागाला लावून, उजव्या बाजूच्या कानाच्या वरच्या कोंपऱ्यापासून रेखणीला वस्तऱ्यानें सुरवात करावी. अशा रीतीनें रेखणी करीत करीत उजव्या कानाच्या वरच्या भागाला वळसा घालून, थेट मानेच्या उजव्या खालच्या भागापर्यंत यावें. आ. नं. ३३ व ३४ पहा ) अशा वेळीं वस्तरा चालविण्यासाठीं 'मोकळा हात' पद्धत वापरावी.

डाव्या बाजूची रेखणी करतांना, कपाळपट्टीच्या डाव्या कोपऱ्या-जवळील कानालगतचा भाग रेखतांना ' उलटा मागचा हात ' पद्धतीनें वस्तरा धरावा, आणि कानावरील भाग व कानाच्या मागील थोडासा भाग रेखतांना ' मोकळा हात ' पद्धतीनें वस्तरा चालवावा. पुढें मानेच्या खालच्या भागाकडे रेखणी करीत येतांना ' उलटा मागचा हात ' ही वस्तरा धरण्याची पद्धत असावी. ( आ. नं. ३५ )




अशा रीतीनें पुढची मागची रेखणी संपल्यावर आजूबाजूला राहिलेला फेंस टॉवेलानें पुसून काढावा आणि मान, गळा, कानाच्या आसपासचा भाग पुसून कोरडा करावा.

## केंस विंचरणें

यानंतरची पायरी म्हणजे, केंस विंचरतांना फणी उजव्या हातांत धरून

केंस विंचरायचा ब्रश डाव्या हातांत धरावा. आधीं सरळ केंस विंचरून गिऱ्हाईकाच्या इच्छेप्रमाणें, डाव्या, उजव्या अगर मध्यभागीं भांग पाडावा. भांग पाडतांना केंसांची विभागणी नीट, सरळ व छान होईल अशी खबरदारी घ्यावी. तसेंच फणीच्या दातांनीं किंवा ब्रशाच्या केसांच्या टोंकांनीं गिऱ्हाईकाच्या मस्तकाची कातडी खरवडल्यासारखी होणार नाहीं, किंवा तिला कसलीच इजा होणार नाहीं, अशी काळजी घ्यायला विसरूं नये.

केशकर्तनकलेच्या मुख्य तंत्राची माहिती ही अशी आहे. पुढील प्रकरणांत वस्तऱ्यानें केंसकापणी करण्याच्या तंत्राची माहिती येईल.



: ६ :

## वस्तऱ्यानें केंसकापणी.

कातरीनें ज्याप्रमाणें केंस कापतां येतात, त्याचप्रमाणें वस्तऱ्यानेंहि केंस कापतां येतात. परंतु वस्तऱ्यानें केंसकापणी करण्याच्या पद्धतीचा उपयोग केंसांवर शेवटचा हात फिरवण्यासाठींच मुख्यत्वेंकरून करतात. साध्या कातरीनें अगर मशीननें केंसकापणी केल्यावर, केंसांना निमुळता घाट यावा व कापणींतील खडबडीतपणा जाऊन, केंस विंचरल्यावर ते आकर्षक व ठाकठीक दिसावेत म्हणून एका विशिष्ट पद्धतीनें केंसांवर वस्तरा फिरवायचा असतो.

### वस्तऱ्यानें केंस कापण्याची कला व तंत्र

कात्रीनें केंसकापणी करण्याची जशी विशिष्ट कला आहे व त्या कलेचें एक विशिष्ट तंत्र आहे, त्याचप्रमाणें वस्तऱ्यानें केंसकापणी

करण्याचेंहि खास तंत्र आहे. कारण वस्तऱ्यानें केंस कापायचे ते वाटेल तसे कापून भागत नाहीं. जेव्हां कात्रीनें किंवा मशीननें केंसकापणी संपेल, तेव्हां वस्तऱ्यानें केंस कापतांना प्रथम मागच्या बाजूकडील केंसाचा एक झुबका ( सुमारें २ इंच रुंदीचा ) घेऊन आ. नं. ३६ मध्यें दाखविल्याप्रमाणें वस्तऱ्यानें केंस कापावे.



३६

साध्या कातरीनें केंस कापतांना कांहीं कांहीं केंस कापण्याचें राहून जातें म्हणा अगर ते केंस कापतां येणें शक्यच नसतें म्हणा; अर्थात् असे केंस वस्तरा फ़िरवूनच कापणें भाग पडतें, विशेषत: नवे वाढते केंस वस्तऱ्यानेंच कापावे लागतात.

वस्तऱ्यानें केंस कापायला सुरवात करण्यापूर्वीं, पूर्व तयारी म्हणून गिऱ्हाईकाचे केस आधीं चांगले विंचरावे. जरूर तर शांपूहि करावा. शांपू न करतांच केंस कापायचे असतील तर केंस चांगले ओले करावेत. मात्र केंस ओले करतांना शक्यतों गरम ( फार गरम नव्हे ) पाण्याचा

उपयोग करावा. तसेंच ह्या पद्धतीनें केंस कापतांना वाटेल तो व वाटेल तसला वस्तरा वापरूं नये. चांगल्या धारदार पात्याचा छानसा वस्तराच उपयोगांत आणावा. फ्रेंचपद्धतीचा भरीव वस्तरा ह्या कामासाठीं वापरणें चांगलें असतें. त्यानें नितळ केंसकापणी करणें सोंपें जातें.

जेव्हां वस्तऱ्यानें केंस कापायचे असतील, तेव्हां केंसांचे सुमारें दोन इंच रुंदीचे झुपके घेऊन ( आ. नं. ३७ पहा ) त्यावर वस्तरा प्रमाणांत


३७

व अगदीं हलक्या हातानें फिरवावा हें जरी खरें असलें, तरीहि जिथें भांग पाडलेला असेल किंवा जिथें भांग पाडायची जागा असेल, त्या जागेपासून भांगाच्या दोन्ही बाजूंना सुमारें पाऊण इंच जागा सोडून, पुढें वर म्हटल्याप्रमाणें दोन दोन इंच रुंदीचे केंसांचे झुपके घेऊन

वस्तऱ्यानें काम करावें. हे झुपके भागाच्या दोन्हीं बाजूंना शिस्तशीर ओळीमध्यें रांगेनें कसे उचलावेत तें आ. नं. ३८ मधील आकृतींत ठिपक्यांनी दाखविलेलें आहे. मागील बाजूला केंसांचे झुपके कापीत कसें यावें हें आ. नं. ३९ मध्यें पाहावें. वरून मानेकडच्या बाजूला येत येत केंस कापावे. मात्र वस्तऱ्यानें केंस कापतांना खबरदारी घेतली पाहिजे ती केंसांना खाप न पडण्याची. जरा का जोरानें हात लागला आणि केंस कापणी संपल्यावर एकादी खाप अगर खांच पडली, तर ती दुरुस्त करतां येणार नाहीं. म्हणून **वस्तरा अगदीं हलक्या हातानें काळजीपूर्वक फिरवणें** अगत्याचें आहे, हें विसरूं नये. अशा रीतीनें केंसांची ठेवण नीटस गोंडस करीत असतांना, वस्तऱ्याच्या प्रत्येक फटकाऱ्यानंतर प्रत्येक वेळेला केंस विंचरणें जरूर असतें. अनेकदां केंस विंचरावे लागले तरी कंटाळा अगर आळस न करतां, जर वस्तऱ्यानें गिऱ्हाईकाचे केंस ठाकठीक केले, तर गिऱ्हाईकाचें कापणी केलेलें डोकें शोभीवंत दिसेल आणि तुम्हीं केलेल्या श्रमाचें सार्थक होईल. केशभूषेला वस्तऱ्यानें टोकें कापायच्या पद्धतीचा फारच उपयोग होतो व त्यामुळें सौंदर्यांत व केशभूषेच्या आकर्षकतेंत अधिक भर पडते. हें लक्षांत घेऊन, आपण ही कला व ह्या कलेचें तंत्र समजावून घेणें अगत्याचें आहे.

तुम्हीं गिऱ्हाईकाच्या केंसाकडे जेवढें अधिक लक्ष पुरवाल, तेवढें तें गिऱ्हाईक अधिक खूष होईल व खास तुमचेंच गिऱ्हाईक होईल, इतरत्र जाणार नाहीं. सारांश, यशस्वी धंदा करूं इच्छिणाऱ्यांनीं केशभूषेंतील प्रत्येक गोष्टीकडे सूक्ष्म रीतीनें व आस्थेनें लक्ष पुरविलें पाहिजे.



: ७ :

## इलेक्ट्रिक कातरीनें केशकर्तन.

इलेक्ट्रिक कातरीनें आजकाल मोठमोठ्या शहरीं सर्रास केशकर्तन केलें जातें. अर्थात् अशा शास्त्रीय पुस्तकांत त्यासंबंधानें जरूर ती माहिती देणें जरूर असल्यामुळें, ह्या प्रकरणांत त्यासंबंधाची थोडक्यांत चर्चा केलेली आहे.

इलेक्ट्रिक कातरी ही साध्या कातरी ऐवजीं अगर मशीनच्या ऐवजीं उपयोगांत आणली जाते. साध्या कातरीनें अगर मशीननें काम करतांना जेवढा त्रास पडतो, तेवढा त्रास ह्या इलेक्ट्रिक कातरीनें काम करतांना होत नाहीं. उत्तम कार्यक्षमता, हाताळण्यांतील सोपेपणा आणि वेळेची बचत, ह्यामुळें इलेक्ट्रिक कातरी अत्यंत लोकप्रिय झालेली आहे. साध्या अगर मशीनकातरीचा मुळींच उपयोग न करतांहि इलेक्ट्रिक कातरीनें

केंसकापणी करणें शक्य असतें. एकदां ह्या कातरीनें काम करायची संवय झाली कीं मग मिशांची कातरणी व रेखणीसुद्धां इलेक्ट्रिक कातरीनें करतां येते. विशेषत: गिऱ्हाईकांची दुकानांत गर्दी असली कीं, झटपट काम उरकण्यासाठीं बऱ्याच वेळां इलेक्ट्रिक कातरीचाच उपयोग करणें भाग पडतें.

ह्या कातरीनें केंसकापणी कशी करतात त्यासंबंधानें लिहिण्यापूर्वी, ह्या कात्रीचा थोडासा जन्मवृत्तांत देणें जरूर आहे. सुमारें ७५ वर्षें युरोपांतील देशांत ह्या कातरीनें काम करण्याची प्रथा अस्तित्वांत आहे. वास्तविक ह्या कातरीचा जन्म युनायटेड स्टेटस् ऑफ अमेरिका ( U. S. A. ) येथें झाला. आणि ह्या यांत्रिक कातरीनें आतां जगांतील सर्व लहानमोठ्या शहरांतील नाभिकांचें प्रेम संपादन केलेलें आहे.

प्रथम ही कातरी अगदींच प्राथमिक अवस्थेंत होती. परंतु इलेक्ट्रिक शस्त्रास्त्रें व साधनसामुग्री तयार करणाऱ्या कारखानदारांनीं ह्या यांत्रिक कातरीच्या बाबतींतहि बरेचसे श्रम करून, एक अशी इलेक्ट्रिक कातरी तयार केली कीं, तिच्या मुठींतच मोटर बसविलेली होती. इतकी सुधारणा झाली खरी, पण तरीहि ती कातरी हाताळणें फारसें सोयीचें व सोपें वाटेना. कारण कातरीच्या मुठींत जी मोटर बसविलेली होती, ती थोडीशी जड होती. त्यावेळच्या मोटर तयार करायच्या कारखान्यांची कार्यक्षमता आजच्या कारखान्यासारखी पराकोटीला गेलेली नव्हती. अर्थात् इलेक्ट्रिक कातरीमध्यें जरी सुधारणा झाली होती तरी ती जड असणें हा दोष कांहीं घालवितां आला नव्हता. परंतु पुढें तोहि दोष नाहींसा करण्यांत तज्ञ यंत्रविशारदांनीं अखेर यश मिळविलेंच ! प्रयोग करतां करतां अगदीं छोटीशीच मोटर तयार करून ती कातरीच्या

मुठींत व्यवस्थित रीतीनें बसवणें शक्य झाल्यामुळें, त्या कातरीचें वजन कमी झालें, आणि त्यामुळें, त्या कात्रीचा उपयोग करणें पूर्वींपेक्षां कितीतरी सोपें झालें.

इलेक्ट्रिक कातरीचे मुख्यतः तीन प्रकार आहेत.

( १ ) एकाद्या बैठकीवर अवजड मोटर बसविलेली असते व तिच्य साहाय्यानें कातरी चालते. हा पहिला प्रकार.

( २ ) मुठींतच छोटीशी मोटर बसविलेली असते, तो दुसरा प्रकार. असल्या प्रकारची कातरी बाळगणें सोपें असतें इतकेंच नव्हे, तर दुकानाप्रमाणेंच गिऱ्हाईकाच्या घरींहि ह्या कातरीच्या योगानें काम करतां येतें.

( ३ ) तिसऱ्या प्रकारची कातरी इलेक्ट्रिक घंटेच्या यांत्रिक रचनेवर आधारलेली असते. आणि म्हणूनच ह्या प्रकारच्या कात्रीला ' घंटा ' पद्धतीची कातरी म्हणतात. ही कातरी बेभरवंशाची असते. कारण तिची गतिहि अनियमित असते आणि कामाच्या सफाईच्या बाबतींतहि म्हणण्यासारखी चांगली नसते. म्हणून दुसऱ्या प्रकारची इलेक्ट्रिक कातरीच कारागिराकडून पसंत केली जाते; आणि त्याच कातरीचा जगांतील केशकर्तनालयांत अधिक उपयोग केला जातो.

ह्या कातऱ्यांना, निरनिराळे तीन कर्तनभाग ( Cutter Leads ) सहज आपल्या जरुरीप्रमाणें हवे तसे जोडतां येतील, अशी खास सोय केलेली असते.

त्या तीन कर्तन-भागांपैकीं जरूर त्या कर्तनभागाचा उपयोग करून,

गिऱ्हाईकाच्या इच्छेप्रमाणें केंस अगदीं बारिक अगर लांब ठेवून कापतां येतात. अगदीं पात्तळ—बारिक केंस कापायचा भाग १/१० मि. मि. ( मिलिमिटर ) असतो. म्हणजे मशीन कातरीचा ०००० हा नंबर असतो. दुसरा भाग २ मि. मि. म्हणजे मशीन कातरीचा १ नं. असतो. ह्या भागाचा उपयोग करून मानेच्या मागच्या बाजूकडील व कानांच्या आजूबंजूचे केंस कापतां येतात. तिसरा भाग ५ मि. मि. म्हणजे मशीन कातरीचा २ नं. असतो. ह्यानेंहि वरील प्रमाणेंच मानेवरचे व कानांच्या आजूबाजूचे केंस कापतां येतात.

## कातरीची रचना

आजकाल बाजारांत निरनिराळ्या प्रकारच्या इलेक्ट्रिक कातऱ्या जरी मिळत असल्या, आणि त्या त्या कारखानदारांचा आपापल्या कातरीनें कांहीं विशिष्ट फायदा होतो असा जरी दावा असला, तरीहि त्यांची रचना सर्वसाधारणपणें सारखीच असते, असें म्हटल्यास मुळींच वावगें होणार नाहीं. कांहीं किंचित् कुठें फरक असलाच तर तो विशेष महत्त्वाचा नसतो. कांहीं यांत्रिक रचनेपेक्षां मूलभूत तत्त्वांत म्हणण्यासारखा फरक नसतो.

## इलेक्ट्रिक कातरीनें केंस कापण्याचें तंत्र

साध्या अगर मशीनकातरीनें केंस कापण्याच्या तंत्रापेक्षां इलेक्ट्रिक कातरीनें केंस कापण्याचें तंत्र थोडेसें निराळें आहे. जर इलेक्ट्रिक कातरीनें केंस कापून साध्या कातरीनें केंस ठाकठीक करायचे असतील, तर विशेष सूचना देण्याची आवश्यकता नाहीं. परंतु जर इलेक्ट्रिक कातरीनें अथपासून इतिपर्यंत केंसकापणीचें काम करायचें असेल, तर मात्र त्या बाबतींत कांहीं सूचना देऊन ठेवणें अगत्याचें आहे.

ज्याला इलेक्ट्रिक कातरी हाताळण्याचें खरें कसब साधलेलें असेल, त्याला साध्या अगर मशीन कातरीची जरुरीच भासत नाहीं. अर्थात् पुढील सूचना ह्या फक्त इलेक्ट्रिक कातरीनें केंसकापणीचें संपूर्ण काम करूं इच्छिणाऱ्यांसाठींच आहेत, असें समजावें.

वास्तविक सर्वसाधारण कातरीनें अगर मशीन कातरीनें केंस कापण्याचें जें तंत्र आहे, तेंच तंत्र इलेक्ट्रिक कातरीनें केंस कापतांनाहि उपयोगी पडतें. फरक एवढाच असतो कीं, इलेक्ट्रिक कातरीनें केशकर्तन करतांना खरें कसब डाव्या हातांतील फणी धरण्यावरच अवलंबून असतें. आधुनिक केशभूषेसाठीं मानेवरचे व कानांच्या बाजूचे केंस बरेच आंखूड ( बारिक ) कापायचे असल्यामुळें, प्रथम २ मि. मि. कर्तनभाग जोडून केशकर्तन करावें. मात्र एकदम खाप पडेल अशा रितीनें कातरी चालणार नाहीं अशी खबरदारी घ्यायला विसरूं नये.

डोकीच्या वरच्या भागावरील, मागच्या उंचवट्यावरील आणि वरच्या दोन्ही बाजूचे केंस कापतांना १० मि. मि. भाग वापरावा. केंस कापतांना फणीनें केंस वर उचलून धरावे. ( आ. नं. ४१ पहा ) हाताच्या मनगटाच्या



कमीअधिक व यथायोग्य हालचालीनें कात्रीच्या पात्यांचें नियंत्रण होतें. व योग्य तो आकार येतो. तसेंच कातरी चालविण्याची गति आ. नं. ४१ मध्यें दाखविल्याप्रमाणें तिरपी असावी. आडवी अगर उभी असूं नये. केंस कापायला सुरवात करण्यापूर्वी योग्य ठिकाणीं भांग पाडून नीट केंस विंचरावेत. केंसांचा योग्य चढउतार साधण्यासाठीं प्रथम डाव्या हातांतली फणी कातडीला लागून धरावी आणि केंस कापतां कापतां ती हळूहळू वरवर उचलीत जावी. केशकर्तनक्रिया चालू असतांना नाभिकानें एक गोष्ट अवश्य लक्षात ठेवली पाहिजे ती ही कीं, इलेक्ट्रिक कातरीची धारदार पातीं फारच जलद चालत असतात. अर्थात् जर का थोडीशी चूक झाली, तर केंसांचा चढउतारपणा योग्य न साधतां खापें पडून केशभूषा विद्रुप होईल! म्हणून इलेक्ट्रिक कातरीनें काम करतांना फारच खबरदारी घेतली पाहिजे. निष्काळजीपणा करून चालणार नाहीं.

केंस बोटांत धरून कापतांना आ. नं. ४२ मध्यें दाखविल्याप्रमाणें बोटांत केंस धरावे व कातरी अशा रीतीनें वर उचलून धरावी कीं तिचीं


४२

पातीं बोटांवर सरळ व सपाट चालवितां येतील. मानेवरील खालचे निकामी केंस इलेक्ट्रिक कातरी फणीशिवाय वापरून कापावे. म्हणजे अशा वेळीं कातरी कातडीला लागून चालेल. हे केंस १/१० मि. मि. पात्यानें काढावे.

## धोक्याची सूचना

इलेक्ट्रिक कातरी वापरतांना गिऱ्हाईकाचे केंस पूर्णपणें कोरडे असले पाहिजेत. **केंस ओले अगर ओलसर असतील तर विजेचा धक्का** (Shock) **बसण्याचा संभव असतो, हें लक्षांत ठेवावें.** त्याचप्रमाणें केंसांचा तेलकटपणा अगर चिकटपणा जाण्यासाठीं आधीं 'शांपू' करणें बरें असतें. १/१० मि. मि. चीं पातीं तीक्ष्ण असल्यानें फणीशिवाय कातडीवरून फिरवतांना नाजुक त्वचा असणाऱ्या गिऱ्हाईकांना फारच त्रास होतो. कधीं कधीं कातडी खरवडून निघाल्यासारखें होतें. म्हणून अशा वेळीं कातडीवर थोडीशी पावडर मारून मगच कातरी फिरवावी. त्याचप्रमाणें उन्हाळयाच्या दिवसांत त्वचेला जो घाम येतो, त्यानें यशस्वी केशकर्तनाला अडथळा होऊं नये म्हणूनहि पावडर लावणें जरूर असतें.



: ८ :

## दाढीमिशा, ब्रश मारणें वगैरे.

दाढी करून झाल्यावर व केशकर्तनक्रिया संपल्यावर, दाढी व मिशा यांच्या ठाकठीकी संबंधानें विचार करणें क्रमप्राप्त आहे. मुसलमान व ख्रिस्ती धार्मियाप्रमाणेंच कांहीं हिंदूही दाढीमिशा वाढवतात. हल्लींहल्लीं तर कित्येक कॉलेजकुमारहि हनुवटीवर छोटीशी दाढी ठेवतात; किंवा कोणी सबंध दाढीहि वाढवतात. दाढी राखणें ही अलिकडे एक फॅशनच झाली आहे. अर्थात् तशा एखाद्या गिऱ्हाईकाची केशभूषा करण्याची वेळ आली, तर दाढीमिशांची कर्तनक्रिया कशीकाय करायची, यासंबंधानें ह्या प्रकरणांत थोडासा विचार करायचा आहे.

### दाढी

दाढयांचे वेगवेगळे अनेक आकार असतात. कित्येक, गुरुदेव टागोरांप्रमाणें अगर कर्मवीर भाऊराव पाटलांप्रमाणें लांबलांब दाढया

वाढवतात, तर कित्येक दाढया वाढवीत असले, तरी मधून मधून त्या केंसांची फाजील वाढ छाटून त्यांना नीटस गोंडस असा आकार आणवतात. कित्येक तर गालांवर दाढीचे केंस न ठेवतां फक्त हनुवटीवरच टोंकदार अशी छोटीशी दाढी ठेवतात. लांब दाढी वाढविणारे बहुतेक डोक्यावरील केंसहि वाढवतात, आणि त्यामुळें केंसांप्रमाणेंच त्यांच्या दाढीलाहि कातरींचा स्पर्श करण्याची पाळी कधीं येत नाहीं. परंतु दुसऱ्या प्रकारच्या वाढीव परंतु आखीवरेखीव आकाराच्या दाढ्या जे ठेवतात, ते मात्र आपल्या डोकीवरच्या केंसांप्रमाणेंच दाढीचे केंसहि कापून छाटून ठाकठीक आकार येईल असें करवतात. तीच गोष्ट हनुवट–दाढी ठेवणाऱ्यांची !

जेव्हां दाढीचे केंस छाटून कापून जरूर तो आकार आणायचा असेल, तेव्हां आधीं डोकीवरचे केंस चांगले विंचरावे. केसांचीं पडलेलीं खुटणें कात्रणें ब्रशानें साफसूफ करून टाकावीं. नंतर दाढी जशा आकाराची हवी असेल, जवळ जवळ तशाच आकारानें दाढीचे केंस फणीनें विंचरावेत. आणि मग कात्रीनें केंसांचीं टोकें कमीअधिक प्रमाणांत जरुरीप्रमाणें कापीत जावें. दाढीला आकार आणतांना साध्या कातरीचा उपयोग करणें चांगलें. जरूर तिथें व जरूर तेव्हांच मशीनकातरीचाहि उपयोग करणें बरें. त्यानंतर दोन्ही गालांवरच्या बाजूचे केंस कापायला घ्यावेत. तसें करतांना कानाजवळील भागाकडून सुरवात करून खालीं हनुवटीच्या दिशेनें काम करीत यावें. हे केस कापतांना फणीनें केस धरून कापावे व केंसांचा आखूडपणा अगर लांबपणा दाढीच्या आकाराला शोभेल असा, परंतु गिऱ्हाईकाच्या मर्जीप्रमाणें राखावा.

नंतर हनुवटीवरील दाढीचा भाग व्यवस्थित करतांना, केंस डाव्या हातांच्या बोटांत धरून प्रमाणांत कापणें बरें. मात्र दाढी आणि मिशा

यांच्या संगमावरच्या भागावरील दाढीचा भाग कापतांना दक्षता बाळगली पाहिजे. नाहींतर दाढीचे केंस कापतां कापतां मिशांचेहि त्या भागाजवळील केंस उगीच छाटले जायची भीती असते! म्हणून त्या भागावरील दाढीचे केंस बारिक करतांना खबरदारी घ्यावी. मिशांचा भाग जिथें दाढीच्या भागाजवळ मिळतो, तिथले केंस जरासे बाजूला करून व उचलून धरून, त्या केंसांखालील दाढीच्या भागाचे केंस साध्या अगर मशीन कातरीनें बारीक करावे. आजकाल दाढी वाढविणारीं कांहीं गिऱ्हाइकें अगदीं बारिक केंसांची दाढी राखीत असल्यामुळें, गळ्याजवळच्या भागावर नं. ०००० ची मशीन व गालांवरील आणि मिशांच्या खालील भागावरील केंस कापण्यासाठीं नं. ००० व नं. ०० च्या मशिनकातऱ्या वापराव्या.

## मिशा

मिशांच्या आकाराप्रमाणें व जाडबारिक रेखणीच्या प्रकारामुळें मिशांच्या निरनिराळ्या पद्धति अस्तित्वांत आहेत. एखाद्या चेहऱ्याला मिशांची जी पद्धत अगर आकार शोभून दिसेल, तीच पद्धत अगर आकार दुसऱ्या एखाद्या चेहऱ्याला शोभून दिसेलच असें नाहीं. म्हणजे केशभूषेंत मिशांच्या रचनेला व आकाराला फार महत्त्व आहे. मिशांच्या आकाराप्रमाणें, लांब-आखूडपणानें व मिशांच्या टोंकांना उर्ध्वगामी अगर अधोगामी वळणें दिल्यानें, चेहऱ्याच्या रुबाबांत कशी कमी अधिक भर पडते व त्यामुळें तरतरीतपणा अगर बावळटपणा कसा दिसून येतो, हें सुप्रसिद्ध साहित्यिक व यशस्वी नाटककार **कॅप्टन मा. कृ. शिंदे** यानीं आपल्या **'नाटकशास्त्र आणि तंत्र'** ह्या पुस्तकांत रंगभूषेची माहिती देतांना फार चांगल्या रीतीनें वर्णन केलेलें

आहे. ( पहा ' नाटकशास्त्र आणि तंत्र ' पान १९२ ) सारांश, नीटस मिशा असल्या तर माणसाच्या रुबाबांत जशी भर पडते व चेहऱ्यावर तरतरीतपणाचें पाणी मारतें, त्याचप्रमाणें मिशा गबाळ्या व कशाबशा असल्या, तर असलेला तरतरीतपणाहि नाहींसा होऊन रुबाबदार व पाणीदार माणूसहि बावळट दिसूं लागतो. म्हणून केशभूषेंत ठाकठीक मिशांना फार महत्त्व आहे.

## मिशांचे कांहीं प्रकार

मिशांचे अनेक प्रकार आहेत. पण त्यांतल्या त्यांत खालीं दिलेल्या आकृतींतील मिशांच्या आठ पद्धती सर्वसाधारणपणें अधिक लोकप्रिय आहेत. ( पहा आ. नं. ४३, ४४, ४५, ४६, ४७, ४८, ४९, ५० )















## केंसावर ब्रश मारण्याची रीत

केशकर्तनक्रिया संपल्यावर गिऱ्हाईकाच्या केंसांवर ब्रश मारायचा असतो. वास्तविक ब्रश मारायचा म्हणजे कांहीं महत्त्वाचें काम नव्हे, असेंच बहुतेकांना वाटेल ! पण तें कामहि वाटतें तितकें सोपें नाहीं. ब्रश मारायचा तोहि शास्त्रशुद्ध पद्धतीनें व यथायोग्य रितीनें मारतां आला पाहिजे. ब्रश मारायचेंहि विशिष्ट तंत्र आहे.

गिऱ्हाईकाचे केंस कापून झाले कीं, केंसांत पडलेलीं खुटणें साफ काढून टाकण्यासाठीं केंसावरून ब्रश मारावा लागतो. ही ब्रश मारायाची क्रिया दोन प्रकारची असते. एकदां केंसाच्या वळणाच्या विरुद्ध दिशेनें केंस परतले जातील अशा रीतीनें ब्रश पुढें ढकलीत ब्रश मारायचे असतात, तर

दुसऱ्यांदा केंसाच्या वळणाच्या दिशेनें केंस जातील अशा रीतीनें ब्रश मागें ओढीत आणायचे असतात. ह्या दोन्ही पद्धती एकामागून एक क्रमानें उपयोगांत आणावयाच्या असतात.

प्रथम एक ब्रश डाव्या हातांत घ्यावा व दुसरा उजव्या हातांत धरावा. आपण गिऱ्हाईकाच्या मागें उभें राहावें. मग डाव्या हातांतील ब्रश गिऱ्हाईकाच्या माथ्यावरील भागाच्या किंचित् डाव्या बाजूकडील केंसावर मारण्यास प्रथम सुरवात करावी. ब्रश मारतांना आधीं ब्रशाचे पुढचे केंस गिऱ्हाईकाच्या केंसांत खुपसून पुढें ढकलीत असतांनाच क्रमानें ब्रशाचा सबंध भाग केंसांवरून फिरेल, अशा रीतीनें ब्रश मनगट फिरवीत केंसावरून फिरवावा. डाव्या हातांतला ब्रश संपूर्ण फिरवून झाला कीं मग त्याच केंसांतून त्याच पद्धतीनें व दिशेनें उजव्या हातांतील ब्रशहि फिरवा. मात्र असें क्रमवार करीत असतांना दोन्ही हातांनीं सारखाच जोर द्यावा. जास्त अगर कमी देऊं नये. तसेंच ब्रश मारतांना आदळआपट अगर धसमुसळेपणा करूं नये. गिऱ्हाईकाच्या डोक्याच्या त्वचेला इजा होईल अशा रीतीनें जोरांत ब्रशांचीं टोकें केंसांत खुपसून, खरवडल्यासारखें अगर टांचण्यांच्या टोंकांनीं बोंचल्यासारखें करूं नये. ब्रश फिरवीत असतांना गिऱ्हाईकाच्या त्वचेला एक प्रकारच्या गोड संवेदना झाल्या पाहिजेत. गुदगुल्या होत आहेत असे वाटलें पाहिजे. हातांच्या बोटांनीं चाळवाचाळवी केल्यासारखें वाटलें पाहिजे. याचा अर्थ असा कीं, गिऱ्हाईकाला ब्रशांच्या केंसाच्या टोंकांचा त्रास होणार नाहीं अशा बेतानें अगदीं हालक्या हातानेंच दोन्हीं हातांतील ब्रश फिरविण्याची तऱ्हा असावी.

वरील प्रमाणें एकामागून एक असें चारदां केल्यावर, मग उजव्या बांजूकडील दुसऱ्या भागावर तशाच तऱ्हेनें ब्रश फिरवावेत. मग गिऱ्हाईकाच्या किंचित् उजव्या बाजूला येऊन डोक्याच्या उजव्या

बाजूच्या केंसांवरून ब्रश फिरवावे. ह्यावेळीं प्रथम उजव्या कानशिला-कडून सुरवात करून डोकीच्या मध्यभागापर्यंत उर्ध्व दिशेनें ब्रश मारावे, असें करत करत गिऱ्हाईकाच्या एका कानशिलाकडून सुरवात करून दुसऱ्या कानशिला पर्यंत यावें. आणि मग मागच्या बाजूच्या केंसावरून, एका कानापासून दुसऱ्या कानापर्यंत आडवे ब्रश मारून केंस फिरवावे.

इतकें झालें म्हणजे ब्रश मारण्याची पहिली अवस्था पुरी होते. नंतर दुसऱ्या अवस्थेला सुरवात करायची असते. पहिल्या अवस्थेंत केंसांच्या नैसर्गिक वळणाच्या उलट दिशेनें पुढें ढकलीत ब्रश मारायचा असतो, तर ह्या दुसऱ्या अवस्थेंत त्याच्या उलट, म्हणजे केंसांच्या नैसर्गिक वळणाच्या दिशेनेंच ब्रश मारायचे असतात. अशा वेळीं केंस मूळांतून उलटसुलट दिशेनें हालणार असल्यानें गिऱ्हाईला त्रास होणार नाहीं अशा रीतीनें आस्ते आस्ते ब्रश फिरवावे. पहिल्या अवस्थेप्रमाणें आपण प्रथम गिईकाच्या मागें जावें आणि पहिल्या प्रमाणेंच दोन्ही हातांत ब्रश धरावेत. मात्र पहिल्याप्रमाणें एकामागून एक ब्रश न फिरवतां उलटसुलट फिरवावे. अखेरीस ब्रश मारणें डोकीच्या मागील उंचवट्यावर संपवावें, कपाळपट्टीच्या बाजूला संपवूं नये.

ब्रश मारण्यची कला मनगटाच्या लवचिकपणावर अवलंबून असते हें विसरूं नये. ब्रश मारतांना ब्रशाचा सबंध केंसाळ भाग उपयोगांत येईल अशा रीतीनें मनगटें फिरवून ब्रश मारण्याची क्रिया करतां आली पाहिजे.

**ब्रश स्वच्छ कसे करावे ?**

केशकर्तन करतांना अनेकदां ब्रश वापरून वापरून तेहि इतर साधनां-प्रमाणेंच खराब होत असतात. केशकर्तनाच्या इतर साधनांप्रमाणेंच केंस विंचरायचे ब्रशहि नेहमीं साफ, शुद्ध व स्वच्छ असले पाहिजेत. त्यासाठीं ब्रश स्वच्छ करण्याची सर्वसाधारण रीत पुढील प्रमाणें आहे.

१. दोन उथळ भांडीं घ्यावींत. ( तस्तासारखीं ) एकांत थंड पाणी घालावें व दुसऱ्यांत गरम पाणी ओतावें. त्या गरम पाण्यांत २ औंस साधा धुण्याचा सोडा घालावा.

२. प्रथम फणीच्या विरळ दातांच्या बाजूनें ब्रशाचे केंस विंचरावेत.

३. नंतर ब्रशाची केंसाळ बाजू खालीं होईल अशा रितीनें ब्रश हातांत धरून, तो गरम पाण्यांत केंस बुडतील अशा बेतानें बुडवावा. ब्रशाची पाठ पाण्यांत बुडवूं नये.

४. वरीलप्रमाणें बराच वेळ ब्रशाचे केंस सोड्याच्या गरम पाण्यांत बुचकळून काढल्यावर तावडतोब तो ब्रश थंड पाण्यांत बुडवावा व तो त्या पाण्यांत कांहीं मिनटें राहूं द्यावा.

५. अशा रीतीनें ब्रशाचे केंस स्वच्छ झाल्यावर, एक नरमसा टॉवेल घेऊन ब्रशाची पाठ चांगली पुसावी व त्याच टॉवेलाच्या घडीवर ब्रशाचे केंस टेकून, ब्रशाच्या पाठीवर हळुहळू थोपटल्या सारखें करावें. म्हणजे ब्रशाच्या केंसांतील सर्व पाणी टॉवेलावर पडेल. अशा रीतीनें ब्रशाची पाठ व केंस पूर्णपणें वाळवावे आणि तो ब्रश उबदार ( गरम नव्हे ) जागीं ठेऊन द्यावा.

केंस झाडायच्या व विंचरायच्या ब्रशांची वरीलप्रमाणें रीतसर स्वच्छता व निगा राखल्यास ब्रश चांगले टिकतातच, पण गिऱ्हाईकांच्या सेवेला स्वच्छ ब्रश वापरल्याचेंहि समाधान लाभतें.

असो. एथपर्यंत दाढीकरणें, केशकर्तनकला व शास्त्र यांची विविध माहिती दिली. आतां पुढील प्रकरणात केशविज्ञान व शांपू यासंबंधानें माहिती मिळेल.



: ९ :

## केशविज्ञान व शांपू ( केशशुद्धि )

केशकर्तनकाराला केशकर्तनक्रिया करतांना केंसांच्या प्रकारांची, वाढीची व केंस ज्या द्रव्यांपासून बनलेला असेल त्या द्रव्यांची माहिती असणें जरूर असतें. केंस त्वचेंत कसा कुठें मूळ धरतो, कसा वाढतो व त्याचा खुंट त्वचेंतून कसा बाहेर येतो, वगैरे गोष्टींची शास्त्रीय माहिती असल्याशिवाय, त्वचेला मर्दनक्रियेची कां जरूरी असते, अगर त्वचा आणि केंस वारंवार कां स्वच्छ करावे लागनात हें कळणार नाहीं. यास्तव त्वचेची व केशविज्ञानाची जरूर तेवढीच माहिती पुढें दिली आहे.

केंस आणि नखें हीं बाह्यत्वचेचींच एक प्रकारचीं रूपांतरें आहेत. केंसाचें मूळ आंतरत्वचेच्या अगदीं खालच्या भागापर्यंत गेलेलें असतें, व तेथूनच केंसाची वाढ होते. केंसाच्या मूळाशीं मज्जातंतु व रक्तवाहिन्या

असल्यामुळे केंस ओढला असतां वेदना होतात; परंतु प्रत्यक्ष केसामध्यें मज्जातंतू नसल्यामुळें केंस कापतांना दुखत नाहींत. केंसाच्या मूळाच्या जरा वरच्या बाजूला एक प्रकारच्या सूक्ष्म ग्रंथी असतात व त्यांतून जो तेलकट पदार्थ बाहेर येतो, त्यामुळें केंस व त्वचा मऊ राहाते. तो पदार्थ नसेल, तर त्वचा कोरडी बनेल आणि तिला तडे जातील: भेगा पडतील ! ( आ. नं. ५१ पहा )



५१

( १ ) शरीरक्षण, ( २ ) स्पर्शज्ञान, ( ३ ) शरीरांतील घाण बाहेर टाकणें, आणि ( ४ ) शरीराचें उष्णतामान कायम राखणें, हीं त्वचेचीं जशीं चार कामें आहेत, त्याचप्रमाणें ( १ ) ऊब राखणें, ( २ ) जरूर तिथें संरक्षण करणें, ( ३ ) स्पर्शज्ञानास मदत करणे, आणि ( ४ ) सौंदर्यास साहाय्यभूत होणें, हे केंसाचे फायदे आहेत. ज्या भागावर केंस असतात ते ते भाग केंस नसणाऱ्या भागपेक्षां अधिक नाजुक असतात.

केंस मुख्यत: तीन प्रकारचे असतात: ( १ ) डोक्यावर किंवा दाढीवर वाढ-

णाऱ्या केंसासारखे लांब व नरम केंस ( २ ) भुवया, पापण्या, किंवा कान आणि नाकपुडयांचा आंतील भाग यांवर वाढणाऱ्या केंसासारखे आंखूड व बांकदार केंस, आणि ( ३ ) शरीराच्या इतर भागावर सर्वसाधारणतः वाढणारे छोटे केंस. केंस कापून त्याच्या खोडाचा कापीव भाग सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहिला तर तो वाटोळा दिसतो. ज्याचे खोड असें वाटोळें दिसतें तो केंस सरळ असतो. ज्या केंसाला नागमोडी लहरी असतात, त्या केंसाचें खोड लंबवर्तुळाकृति असतें. आणि ज्या खोडाचा आकार सपाट असतो, तो केंस कुरळा असतो. म्हणजे ( १ ) सरळ, ( २ ) नागमोडी, आणि ( ३ ) कुरळा असेहि केंसाच्या वाढीच्या व वळणाच्या दृष्टीनें निरनिराळे तीन प्रकार असतात, हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे.

## केंसाचीं घटकद्रव्यें

केंस हा कोणत्या एकाच द्रव्यानें घडत नाहीं. त्यांत विशिष्ट द्रव्यें विशिष्ट प्रमाणांत असतात आणि त्या सर्व द्रव्यांच्या रासायनिक संस्कारांनींच केंसाची घडण होत असते. केंसांत मुख्यतः पुढील द्रव्यें त्या त्या प्रमाणांत असतात, असें शास्त्रज्ञांचें मत आहे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ( १ ) कार्बन ( एक निर्धातुक रासायनिक मूलतत्त्व ) | शेंकडा | ४९ | ते | ५० | टक्के. |
| ( २ ) नायट्रोजन ( वातावरणांतील एक घटक वायु ) | ,, | १९ | ते | १७.९३ | ,, |
| ( ३ ) गंधक | ,, | ३ | ते | ९ | ,, |
| ( ४ ) ऑक्सिजन ( प्राणवायु ) | ,, | २१ | ते | २५ | ,, |
| ( ५ ) हायड्रोजन (एक जलघटक वायु) | ,, | सुमारें | | ५ | ,, |

## त्वचेची व केसांची स्वच्छता

शरीरांतील घाण त्वचेवाटे बाहेर पडते. त्याचप्रमाणें केसांना आपण जीं तेलें वगैरे वापरतों, त्या चिकटपणामुळें बाहेरची धूळसुद्धां केसांत जाऊन त्वचेवर सांठते. तसेंच त्वचेमध्यें रक्तवाहिन्या व मज्जातंतू पसरलेले असतात. मज्जातंतुमुळें आपल्याला स्पर्शज्ञान होतें. तसेंच त्वचेच्या खालच्या बाजूला घाम उत्पन्न करणाऱ्या **घर्मग्रंथी** असतात. प्रत्येक ग्रंथी ही एका नळीच्या वेटोळ्यानीं बनलेली असते व तिच्यापासून एक घर्मवाहक नलिका निघून, त्वचेच्या पृष्ठ भागावर उघडते. बाह्य त्वचेवर जीं असंख्य छिद्रें असतात, तीं या नलिकांचीं तोंडेंच होत. घर्मग्रंथी भोंवतीं सूक्ष्म रक्तवाहिन्यांचें जाळें असतें व त्यामधून वाहाणाऱ्या रक्तांतून कांहीं निरुपयोगी द्रव्यें निराळीं करण्याचें काम घर्मग्रंथीकडून केलें जातें. घामामध्यें पाणी, मूत्रीय ( युरिया ), कर्बद्विप्राणिल वायु व मीठ हीं द्रव्यें असतात. तीं द्रव्यें घर्मवाहक नलिकेंतून त्वचेच्या पृष्ठावर येऊन पोहोंचतात आणि तिथेंच तीं राहूं दिलीं तर डोक्यांत घाण होते. उवा होतात किंवा त्या घाणीने कांहीं त्वचारोग किंवा केशरोगहि निर्माण होतात. असे रोग झाल्यावर मग त्यावर उपाय करण्याची यातायात करण्यापेक्षां, तसे रोग आधीं होणारच नाहींत, अशी प्रतिबंधक उपाययोजना करणें व जरूर ती खबरदारी घेणें शहाणपणाचें व हिताचें नाहीं का ?

## शांपू करणें

वर म्हटल्याप्रमाणें डोकींत उवा, त्वचारोग अगर केशरोग न होण्यासाठीं जी खबरदारी घ्यावयाची असते, ती म्हणजेच स्वच्छता राखणें ही होय. डोक्याची त्वचा व केंस स्वच्छ ठेवले कीं त्वचारोग अगर केशरोग

होण्याचा संभव कमी असतो. डोक्यांतील मळ काढून केंस स्वच्छ करण्यासाठींच 'शांपू' ही क्रिया करावी लागते. शांपू ह्या इंग्रजी शब्दानें बिचकण्याचें मुळींच कारण नाहीं. कारण शांपू म्हणजे डोक्यांतील मळ काढून केंस स्वच्छ व साफ करण्याची क्रिया. हें काम फारसें कठीण नाहीं. मोठमोठ्या शहरांतच नव्हे तर बारक्यासारख्या एखाद्या खेड्यांतील नाभिकहि ही क्रिया करित असतो. डोकीच्या केंसांना तेल किंवा तेल–पाणीमिश्रण भरपूर चोपडून, मग फणीनें विंचरून विंचरून डोक्यांतील मळ काढायची गांवठी पद्धत फार पुरातन आहे. त्याच पद्धतीला जें आधुनिक शास्त्रीय स्वरूप आलेलें आहे, त्यालाच हल्लीं 'शांपू' म्हणतात एवढेंच. दर आठवड्याला—साधारणपणें दर शनिवारीं आपल्याकडील स्त्रिया केंसावरून आंघोळ करतात, आणि तसें करतांना खार, सोडा, अगर शिकेकाई वापरून चांगला फेंस काढून केंस धुतात, यांतील मर्महि डोकीची त्वचा व केंस स्वच्छ करणें हेंच असतें.

## शांपू त्याचे प्रकार व तो कसा करावा ?

शांपू करण्याची आधुनिक पद्धत अधिक शास्त्रशुद्ध असल्यानें, ती क्रमवार माहिती प्रत्येक नाभिकाला असणें जरूर आहे. आणि म्हणूनच ती सर्व माहिती थोडक्यांत इथें देत आहें.

शांपू दोन प्रकारचे असतात. एक **ओला शांपू** आणि दुसरा **कोरडा शांपू.** ओला शांपू करतांना गरम आणि थंड पाणी वापरून केंस स्वच्छ करतात. कोरडा शांपू करतांना पाण्याचा उपयोग करीत नाहींत. वास्तविक कोरडा शांपू हा ओलाच शांपू असतो, पण पहिल्या आणि दुसऱ्या शांपूंत फरक इतकाच असतो कीं, पहिल्या शांपूंत पाण्याचा

उपयोग करतात आणि दुसऱ्या शांपूत पाण्याचा उपयोग न करतां स्पिरीटयुक्त द्रवपदार्थाचा ( लोशनचा ) उपयोग करतात.

## ओला शांपू अर्थात् पाण्यानें केंस धुणें

जेव्हां पाण्यानें गिऱ्हाईकाचे केंस धुवायचे असतील, तेव्हां गरम आणि थंड पाण्याचा भरपूर सांठा तयार ठेवावा. दोन तस्तें ( Basins ) आणि तीन नरम टॉवेल एवढी साधनसामुग्री जवळ असावी. गिऱ्हाईकाला तस्तावर मान पुढें करून बसायला सांगावें. आणि मग एक टॉवेल गिऱ्हाईकाच्या पुढच्या बाजूला, त्याचे कपडे खराब होऊं नयेत म्हणून, गळ्यापासून खालीं लोंबता सोडावा, आणि एक टॉवेल त्याच्या गळ्याभोंवती गुंडाळावा. असें केल्यानें गिऱ्हाईकाची कॉलर वगैरे खराब होणार नाहीं आणि पाणीहि खालीं उतरणार नाहीं. तिसरा टॉवेल केंस धुतल्यानंतर ते पुसण्यासाठीं वापरावा. ही पूर्वतयारी झाल्यावर पुढीलप्रमाणें कृति करावी.

प्रथम आपण गिऱ्हाईकाच्या पाठीमागें उभें राहून गिऱ्हाईकाचे केंस चांगले ओले करावे. तसें करतांना उजव्या हातांनीं पाणी ओतण्याची क्रिया चालू ठेवावी व डाव्या हातानें केंसांतलें पाणी कानाच्या बाजूनें अगर मानेवरून सरळ खालीं उतरूं नये म्हणून तें पटकन् काढून टाकीत राहावें. अशा रीतीनें केंस चांगले भिजले कीं उजव्या हातानें शांपूचें पाणी केंसांवर शिंपडीत राहावें व डाव्या हातानें केसांची चाळवाचाळव सुरू ठेवावी. मग दोन्ही हातांच्या बोटांच्या टोंकानीं अगदीं हलके हलके केंसांच्या मुळांना चाळवल्या सारखें, खाजवल्यासारखें करावें, व तसें करतां करतां भरपूर फेंस येऊं द्यावा. गरगरीत भरपूर फेंस आला कीं तो काढून टाकावा. आणि गिऱ्हाईकाच्या डोक्यावरील त्वचेला चटका बसणार नाहीं, त्याला सोसवेल एवढ्याच प्रमाणांत गरम असलेल्या पाण्यानें

तस्तामध्यें केंस चांगले धुऊन काढावे. नंतर आणखी एकदां शांपूचें पाणी केंसांत शिंपडून पूर्वींप्रमाणेंच फेंस काढावा, पण पूर्वीं इतका वेळ केंसांत बोटें खुपसून खाजवू नये. फेंस येतांच तो काढून टाकून मग केंस धुवायला सुरवात करावी. मात्र ह्यावेळीं पाण्याचें उष्णतामान हळुहळू कमी करीत करीत शेवटीं अगदीं थंड पाणी वापरावें. म्हणजे ह्या दुसऱ्या खेपेला, प्रथम गरम पाणी, मग आणखी कमी गरम पाणी, मग कोंबट पाणी आणि अगदीं शेवटीं एकदम थंड पाणी वापरून केंस धुऊन टाकावे. नंतर अर्थातच राखून ठेवलेल्या तिसऱ्या टॉवेलानें केंस चांगले पुसावेत. केंसांत पाणी राहूं देऊं नये. शक्य असल्यास नंतर यांत्रिक ( बिजलीच्या) साधनानें ते वाळवावे. मात्र आधीं टॉवेलानेंच केंस पुसून कोरडे करावे, हें उत्तम. तसेंच केंसांत दोन्हीं हातांचीं बोटें खुपसून चाळवाचाळव (मर्दन) करतांना, बोटांच्या टोकांकडील मांसल भागाचाच उपयोग करावा; तळव्यांनीं चुकूनसुद्धां कधीं चोळूं नये. त्याचप्रमाणें बोटांचीं नखें गिऱ्हाईकाच्या डोक्याच्या त्वचेला रुपणार नाहींत, अशीहि खबरदारी घ्यावी. दोन्हीं हातानीं हळुहळू चोळीत शांपूचा फेंस काढतांना हातांची हालचाल कौशल्यपूर्ण असावी; डोक्याला धक्के बसूं नयेत. केंस स्वच्छ करण्यासाठीं बाजारांत निरनिराळीं औषधी द्रव्यें मिळतात. पण केंसाची जात बघून योग्य शांपूचाच उपयोग करायला शिकावें.

## कोरडा शांपू करणें

ओला शांपू आणि कोरडा शांपू यांच्या वापरांत फारसा फरक नसतो. कोरडा शांपू करणें सोपें असल्यानें तो शांपू केशकर्तनालयांतून वापरण्यांत येतो. परंतु तो सोपा आहे याचा अर्थ तो वापरतांना फारशी काळजी घेण्याचें कारण नाहीं, असामात्र नव्हे. वास्तविक केंस व डोकें योग्य-

रीतीनें धुऊन स्वच्छ करणें ही एक कलाच आहे. अर्थात् त्या कलेच्या शास्त्रशुद्ध माहितीशिवाय केंस धुण्याचा प्रयत्न केल्यास त्यापासून आज ना उद्यां गिऱ्हाईकाच्या त्वचेला अगर केंसांना अपाय होण्याचा संभव असतो. म्हणून ओल्या शांपूनें केंस धुवायचे असोत, अगर कोरड्या शांपूचा उपयोग करून केंस धुवायचे असोत, योग्य ती खबरदारी व योग्य ती पद्धति ह्या दोन गोष्टींकडे पूर्ण लक्ष देणें अगत्याचें असतें.

कोरड्या शापूनें केंस ओले करतांना, शांपू वाटेल तसा ओतूं नये. फक्त तो शिंपडावा. खूप शांपू लोशन केसांत ओतलें, तर त्वचेला आणि केसांना इजा पोंचण्याचा धोका असतो. शांपू शिंपडतांना, पक्षी आपल्या पायाचीं बोटें जशीं एकत्र करून आवळून धरतात, त्याचप्रमाणें नाभिकानें आपल्या हाताचीं बोटें जवळजवळ धरून, तीं केंसांत खुपसून खाजवल्यासारखें करावें. तसें करतांना एक महत्वाची गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं, बोटांच्या टोकांनींच चोळावें. हाताच्या सपाट पंजानें कधींहि शांपूलोशन चोळूं नये. तशानें एखादे वेळीं गिऱ्हाईकाच्या लांब केंसाच्या गांठी बनतील किंवा गुंतागुंत होईल व ती सोडविण्यासाठीं अखेर ते केंस कापण्याची पाळी येईल ! असो.

वरीलप्रमाणें शांपूलोशन शिंपडून, बोटांनीं चोळूनचोळून केसांत त्याचा पुरेसा फेंस काढावा व तो फेंस नाहींसा होईपर्यंत बोटांची हालचाल चालू ठेवावी. मग केस टावेलानें स्वच्छ पुसून साफ कोरडे करावे. आणखी एक गोष्ट नाभिकानें लक्षांत ठेवली पाहिजे. ती गोष्ट म्हणजे शांपूलोशनची निवड ! कारण बाजारांत अनेक कारखानदारांचीं अनेक लोशनें मिळतात. त्यांपैकीं एखादें लोशन केवळ स्वस्त मिळतें म्हणूनच त्याची निवड करूं नये. नाहींतर ‘ स्वस्ताईचा

माल, वापरल्यावर हाल ! ' अशी स्थिति होऊन, गिऱ्हाईकांचें व त्याचबरोबर आपल्या धंद्याचेंसुद्धां नुकसान व्हायचें ! म्हणून थोडें महाग असलें तरीहि हरकत नाहीं; पण **चांगलें असेल तेंच शांपू-लोशन वापरावें.** त्या बाबतींत थोडासुद्धां निष्काळजीपणा करतां कामा नये. त्यासाठीं चार पैसे जास्त खर्च करायला मागेपुढें पाहूं नये. चांगल्या मालासाठीं थोडासा जादा खर्च झाल्यासारखा वाटला, तरी त्यामुळें गिऱ्हाईक खूष होऊन तें तुमच्या दुकानाची व तुमच्या कामाची तारीफ करील व त्यामुळें अधिक गिऱ्हाईकें तुमच्या दुकानांत येऊं लागतील— सतत तीं तुम्हाला आश्रय देत जातील. आणि अशा रीतीनें तुम्हीं केलेल्या जास्त खर्चाची अनेक पटीनें भरपाई होईल ! नुकसान भरून येईल. याच्या उलट, पैशाचा थोडासा लोभ धरून, तुम्हीं जर स्वस्त पण परिणामीं वाईट असा माल वापराल, तर त्यामुळें गिऱ्हाईकाचें नुकसान होऊन तुमचा बदलौकिक होईल, आणि असें होतां होतां गिऱ्हाईकें तुमच्या दुकानांतहि पाय ठेवायचीं बंद होतील ! सारांश, थोड्याशा अयोग्य काटकसरीनें बरेंचसें नुकसान होतें. धंद्यावरहि वाईट परिणाम होतो आणि नाभिकसमाजाबद्दल व नाभिकांच्या पुरातन कलेबद्दल लोकांचा गैरसमज होतो. म्हणून शांपूक्रियेसंबंधानें वरील सर्व माहिती पूर्णपणें वाचून, गिऱ्हाईकाचें समाधान व स्वतःचा फायदा करून घ्यायला शिकावें.



: १० :

## मुखमर्दनकला व स्नायूविज्ञान

चेहऱ्याचें व डोक्याच्या त्वचेचें प्रमाणांत मर्दन करणें ही एक स्वतंत्र कला आहे. शास्त्रशुद्ध पद्धतीनें वरील दोन्ही भागांचें मर्दन केल्यास ( १ ) त्या त्या भागाच्या त्वचेला टवटवी येते, ( २ ) शिरांना सूक्ष्म धक्के मिळाल्यामुळें रक्ताभिसरणास मदत होते, ( ३ ) स्नायु ताजेतवाने व तरतरीत होतात, ( ४ ) ज्ञानतंतू उत्तेजित होतात व त्यांची कार्यक्षमता वाढते, आणि ( ५ ) चरबीची फाजील वाढ न होतां, जिथें जिथें चरबी सांचल्यामुळें बेडौलपणा आलेला असतो, तो नाहींसा होतो. डोक्याच्या त्वचेला मर्दन केल्यानें तर आणखी एक फायदा असतो. तो असा कीं, केंसांच्या मुळाशीं असलेला तेलकट स्राव प्रमाणांत सुरू झाल्यानें केंस गळणें अगर अकालीं पिकणें बंद होतें. आणि त्वचेचीं छिद्रें साफ मोकळीं झाल्यानें ऑक्सिजन वायू शोषून घेणें व कार्बनवायूयुक्त निरुपयोगी द्रव्यें बाहेर टाकणें त्वचेला सहज शक्य होतें.

मसाज ऊर्फ मर्दन करतांना ज्या भागावर मर्दन करावयाचें, त्या भागाच्या शारीरिक रचनेची आधीं संपूर्ण माहिती करून घेतली पाहिजे. कारण डोक्याच्या कवटीचीं व तोंडाच्या जबड्याचीं हाडें कशीं असतात, आणि त्या हाडांवरील स्नायूंचें वेष्ठन कसें असतें इत्यादि गोष्टींचा सूक्ष्म अभ्यास करूनच मर्दनक्रियेची गति व दिशा तज्ज्ञांनीं ठरविलेली आहे. आ. नं. ५२ मध्यें सबंध डोक्याची ( चेहऱ्यासह ) अस्थिरचना दाख-



आ. नं. ५२

विलेली असून, आ. नं. ५३ मध्यें सबंध चेहऱ्याची व मानेची स्नायु-रचना दाखविलेली आहे. ह्या आकृतींचा सूक्ष्म अभ्यास करणें अत्यंत आवश्यक असतें. कारण स्नायूंच्या रचनेची व त्यांच्या हालचालीची दिशा कळली, तरच त्या त्या भागावर मर्दन करण्याची दिशा कळूं



आ. नं. ५३

शकेल. तसें न करतां केवळ मर्दन करायचें म्हणून केलें, तर गिऱ्हाई-काला संतोष वाटणार नाहीं, आणि स्वतःचे श्रमहि पाण्यांत जातील! यासाठीं मागील दोन्ही आकृतींतील विशेषतः नं. ५३ मधील आकृतींतील स्नायुरचना व त्यांच्या दिशा प्रत्येक नाभिकानें लक्षपूर्वक अभ्यासाव्या.

## मुखमर्दन कसें करावें ?

डोक्याच्या त्वचेला मर्दन करतांना, केंस स्वच्छ करतांना ज्याप्रमाणें हातांच्या बोटांनीं केंस चाळवतात, त्याचप्रमाणें दोन्हीं हातांच्या बोटांच्या मांसल टोकांनीं डोकीची त्वचा इजा न करतां बोचकरल्यासारखी व कांहींशी रगडल्यासारखी करावी. (आ. नं. ५४ ते ५८ पहा)



५४

परंतु मुखमर्दन करणें तसें सोपें नाहीं. चेहऱ्यांत अनेक लहान मोठे स्नायू असतात आणि त्यांच्या रचनेच्या दिशा कधीं आडव्या उभ्या, कधीं वर्तुळ–अर्धवर्तुळाकृति, तर कधीं तिरप्या असतात. अर्थात् तो तो स्नायू मर्दन करतांना आपल्या मनाला वाटेल तसें मर्दन करून भागत नसतें. स्नायूचें वळणहि लक्षांत घ्यावें लागतें.

मुखमर्दनासाठीं 'बोटें' ह्या नैसर्गिक साधनाचाच शक्यतों उपयोग करावा. मात्र मुखमर्दन करणाऱ्याला कोणताहि त्वचारोग असूं नये. ज्यांना हातांच्या बोटांचा उपयोग करायचा नसेल, त्यानीं व्हायब्रेटर ( Vibrator ) ह्या विजेच्या साधनाचा उपयोग करावा. मुखमर्दनासाठीं एखाद्या चांगल्या क्रीमचा उपयोग करणें बरें. मर्दनक्रियेच्या पुढील-प्रमाणें सहा अवस्था आहेत.

## मर्दनक्रियेच्या अवस्था

( १ ) गिऱ्हाईकाला व्यवस्थेशीर बसवून व चादर–टॉवेल वगैरेनीं त्याचे कपडे झांकून, गरम ( वाफयुक्त ) टॉवेलानें चेहरा पुसून काढावा.

( २ ) चेहऱ्याच्या कातडीवर प्रमाणशीर क्रीम लावावी.

( ३ ) बोटांच्या मांसल टोकांचा उपयोग करून हलक्या हातानें सर्वत्र सारखा जोर देऊन, वर्तुळाकृति गतीनें क्रीम जिरेपर्यंत हळू हळू चोळावें, व टॉवेलानें तोंड पुसावें.

( ४ ) थंड क्रीम (Cold cream ) लावून व परत थोडा वेळ चोळून चेहरा साफ करावा.

( ५ ) परत गरम टॉवेलानें चेहरा पुसून काढावा.

( ६ ) आणि शेवटीं थंड टॉवेलानें तोंड पुसून चांगलें कोरडें करावें, आणि पावडर मारून साफ करावें.

## व्हायब्रेटरनें मुखमर्दन

विजेच्या साहाय्यानें चालणारें मुखमर्दनाचें साधन पुढीलप्रमाणें वापरावें

( १ ) व्हायब्रेटर जलद फिरवूं नये.

( २ ) व्हायब्रेटरनें मुखमर्दन करतांना प्रथम डाव्या नाकपुडीपासून सुरवात करावी.

( ३ ) व्हायब्रेटर हलक्या हातानें धरून वरच्यावर अगदीं जपून फिरवावा.

( ४ ) स्नायूंच्या रचनेप्रमाणें व्हायब्रेटर फिरविण्याची दिशा असावी.

बोटांच्या साहाय्यानें अगर व्हायब्रेटरच्या साहाय्यानें मुखमर्दन करतांना बोटें अगर व्हायब्रेटर कसा फिरवावा तें पुढें आ. नं. ९९ मध्यें दाखविलेलें आहे. बोटांनीं मुखमर्दन करतांना हाताच्या आंगठ्याजवळील पहिल्या दोन बोटांचा प्रामुख्यानें उपयोग करावा. बोटांनीं मुखमर्दन केल्यावर व पावडर लावल्यावर ती पुसून टाकण्याआधीं जर आणखी व्हायब्रेटरनें मुखमर्दन केलें, तर 'अधिकस्याधिकं फलम्' ह्या न्यायानें विशेष फायदा होतो. म्हणून त्या दोन्ही मुखमर्दन पद्धतींचा उपयोग केल्यास उत्तम ! वर प्रथम डाव्या बाजूला सुरवात करावी असें म्हटलेलें आहेच. उजव्या बाजूलाहि त्याच क्रमानें मुखमर्दन करावें. वरच्या ओठावरील भागावर पुढें–मागें ह्या गतीनें आडवीं बोटें फिरवित मुखमर्दन करावें, किंवा त्याच गतीनें व पद्धतीनें व्हायब्रेटर फिरवावा. आकृतींत दाखविल्याप्रमाणें कपाळावर मर्दन करावें. मात्र व्हायब्रेटर बराच वेळ



एकाच ठिकाणीं ठेवूं नये. त्याचप्रमाणें व्हायब्रेटरनें मुखमर्दन करतांना चेहरा कोरडा असेल असें करावें. ओल्या चेहऱ्यावर विजेचा व्हायब्रेटर वापरूं नये.

वास्तविक मुखमर्दनाप्रमाणेंच संपूर्ण शरीरमर्दन करणें, ही एक स्वतंत्र कला आहे व तो एक स्वतंत्र विषय आहे. पाश्चात्य देशांत त्या त्या कलांवर अनेक ग्रंथ आहेत व मर्दनकलेचें शास्त्रोक्त शिक्षण देणाऱ्या अनेक शैक्षणिक संस्थाहि आहेत. परंतु ह्या पुस्तकांत फक्त केशभूषेशीं मर्दनकलेचा जेवढा संबंध येतो, तेवढया पुरतेंच लिहायचें असल्यामुळें, केशकर्तनकारांना उपयुक्त ठरेल एवढीच व्यावहारिक माहिती ह्या पुस्तकांत मी थोडक्यांत दिलेली आहे.



: ११ :

## केशकर्तनालयासाठीं संकीर्ण माहिती

आतांपर्यंत मागील प्रकरणांत केशभूषेच्या केशकर्तनादि विविध रीतींचीं माहिती देण्यांत आली आहे. ह्या प्रकरणांत केशकर्तनालयासंबंधानें व आणखी कांहीं महत्त्वाच्या बाबींसंबंधानें थोडेंसें विवेचन करणार आहें.

पुष्कळदां एखाद्याला केशकर्तनालय काढावेंसें वाटलें कीं, तो साधन-सामुग्री विकत घेऊन व एखादी चांगलीशी जागा भाड्यानें घेऊन दुकान थाटतो. परंतु प्रत्येक दुकान यशस्वी रीतीनें चालेलच असें नाहीं. एखाद्या नाभिकाचें एखादें दुकान भरभराटीला येतें, आणि एखाद्यानें शेंकडों रुपयांचें भांडवल दुकानांत गुंतवलेलें असतांहि आश्रयदात्यांच्या अभावा-मुळें अखेर लौकरच दुकानाला कुलूप ठोकायची पाळी येते ! असें कां होतें ? लोक, ज्याचे दुकान चागलें चालतें, म्हणजे ज्याचा धंदा चांगला

चालतो, त्याचे मित्र असतात आणि ज्याला दुकान बंद करावें लागतें, त्याचे शत्रू असतात, असा का याचा अर्थ करायचा? नाहीं! लोक कोणाचेहि मित्र नसतात आणि कोणाचेहि शत्रू नसतात. लोकांना आपणच आपले मित्र अगर शत्रू बनवीत असतों. याचा अर्थ असा कीं, केशभूषाशास्त्र आणि तंत्र कळलें आणि स्वतःचा अगर कर्जाऊ काढलेला थोडासा पैसा जवळ असला, म्हणजे केशकर्तनालयाचा धंदा यशस्वी होतोच, असें मुळींच नाहीं. त्यासाठीं कांहीं मूलभूत गोष्टींचा आधीं नीट विचार केला पाहिजे. आहे जागा, घ्या साधनें आणि उघडा केशकर्तनालय, असें करून चालत नाहीं. केशकर्तनालय काढायचें तें स्वतःसाठीं काढायचें नसून, लोकांच्या सोयीसाठीं काढायचें असतें, हें बहुधा पुष्कळ नाभिक विसरतात. केशकर्तनालय सुरू केल्यानें स्वतःला चार पैसे मिळविण्याची शक्यता असते हें खरें असलें, तरीहि ते जे चार पैसे मिळायचे ते लोकांच्या खिशांतूनच मिळायचे असतात! म्हणजेच केशकर्तनालय चालणें अगर ओस पडणें ह्या गोष्टी लोकांवर, म्हणजेच ग्राहकांवर अवलंबून असतात. म्हणून केशकर्तनालय हें ग्राहकांच्या सोयीसाठीं असतें हें ध्यानांत घेऊन, त्यासाठीं जी जागा शोधायची, ती लोकांना सोयीस्कर अशी व पसंत पडेल अशी असणें जरूर असतें. त्याचप्रमाणें दुकानाच्या आजूबाजूचें व दुकानांतलें वातावरणहि चित्तवेधक, प्रसन्न आणि सुंदर असणें आवश्यक असतें. ह्या बाबतींत पाल्हाळ न लावतां सांगायचें म्हणजे, ज्या योगें गिऱ्हाईक आपल्या दुकनांत येईल व एकदां आलेलें गिऱ्हाईक इतरत्र न जातां आपल्याच दुकानाला सतत आश्रय देईल, असेंच केशकर्तनालय असलें पाहिजे. त्याचप्रमाणें केशकर्तनालयाच्या बाबतींत पुढील कांही गोष्टी अवश्य लक्षांत असूं द्याव्या.

## महत्त्वाच्या गोष्टी

(१) केशकर्तनालय हें लोकांच्या येण्याजाण्याच्या वाटेवर, सहज सांपडेल अशा ठिकाणीं, आणि ठळकपणें नजरेंत भरेल, असें असावें.

(२) दुकानांत भरपूर हवा खेळेल अशी रचना असावी व प्रकाशाचीहि सोय असावी.

(३) दुकानांत गरम व थंड पाण्याचा भरपूर सांठा असावा.

(४) केशकर्तनालयाचा उपयोग, खाण्यापिण्यासाठीं, राहाण्यासाठीं किंवा झोपण्यासाठीं करूं नये.

(५) फरशीवर पडलेला केशकर्तनविषयक कचरा तावडतोब कचऱ्याच्या पेटींत टाकावा. जमिनीवर कसलाच केरकचरा फार वेळ पडूं देऊं नये. वेळच्यावेळीं दुकान झाडून साफसूफ व स्वच्छ करावे.

(६) प्रत्येक गिऱ्हाईकासाठीं स्वतंत्र चादर व टॉवेल वापरतां येतील, इतक्या चादरी व टॉवेल्सचा सांठा असावा. तेच तेच टॉवेल अगर चादरी वापरूं नये. चादरी व टॉवेल परीटघडीचे स्वच्छ असावे, व ते स्वच्छ कपाटांत ठेवावे.

(७) केशकर्तनालयांत केशभूषेचें कोणतेहि काम करणाऱ्या कारागिराला गणवेश असावा. गणवेशाच्या कपड्याचा रंग सफेत असणे बरें ! दुकानाला आंतून पांढराच रंग अगर डोळ्यांना आल्हादक होईल असा एखादा छानसा रंग दिलेला असावा.

(८) केशभूषेचें कोणतेंहि काम करतांना कारागिरानें कामापूर्वीं आणि नंतर स्वतःचे हात ( शक्यतों ) गरम पाण्यानें धुऊन स्वच्छ कपड्यानें पुसावे.

(९) केशकर्तनाल्यांतील खुर्च्याटेबलें, आरसे, बाटल्या, इतर साधनें इत्यादि सामानसुमान व वस्तू नीट जागच्याजागीं सुन्दर मांडून ठेवलेल्या असाव्या. काम झालें कीं प्रत्येक वस्तु जिथल्यातिथें ठेवून द्यावी. सामानसुमान व केशभूषेचीं साधनें अस्ताव्यस्त पडलेलीं नसावीं.

(१०) स्वच्छता, टापटीप आणि शिस्त ह्या त्रिगुणांवर केशकर्तनाल्याचें आयुष्य अवलंबून असल्यानें, त्या त्या गोष्टीकडे पुरवतां येईल तेवढें लक्ष पुरवायला आळस करूं नये.

## स्वच्छता

देवळांत जशी आपण स्वच्छता ठेवतों तशीच स्वच्छता केशकर्तनालयांतहि असली पाहिजे. स्वच्छतेची संवय एकदां लावून घेतली, कीं मग स्वच्छता ठेवावी, असें कोणी सांगण्याची जरूरी भासत नाहीं. आपला धंदा हा अनेक लोकांशीं प्रत्यक्ष संबंध येणारा धंदा आहे. आपल्या कामांत आपल्याला गिऱ्हाईकाच्या अगदीं जवळ जावें लागतें. त्याच्या त्वचेला प्रत्यक्ष हस्तस्पर्श होतो. अर्थात् एखाद्या गिऱ्हाईकाला जर यदाकदाचित् एखादा त्वचारोग असलाच, तर तो दुसऱ्याला लागायला आपण सहज कारणीभूत होऊं शकतों. म्हणून प्रत्येक गिऱ्हाईकासाठीं एकदां वापरलेलीं हत्यारें व साधनें परत तींच तशींच्या तशीं दुसऱ्या गिऱ्हाईकाच्या केशभूषेसाठीं वापरूं नयेत. आधीं तीं

जंतूनाशक औषधांत टाकून अगर उकळत्या पाण्यांत कांहीं वेळ ठेवून मगच उपयोगांत आणावीं.

( १ ) हत्यारांच्या व साधनांच्या स्वच्छतेसाठीं व रोगजंतूचा पूर्णपणें नाश होण्यासाठीं 'फोर्म्यांलिन' ( Formalin ) नांवाचें जंतूनाशक रसायन मिळतें तें वापरावें. दोन भाग रसायन, पांच भाग पाणी व एक भाग ग्लिसरीन यांच्या मिश्रणांत हत्यारें सुमारें दहा मिनिटें ठेवावीं. ( ह्या मिश्रणाला २५ % फोरम्यालिन मिश्रण म्हणतात. )

( २ ) फण्या, ब्रश इत्यादि साधनें जंतुरहित करण्यासाठीं, १ भाग रसायन व नऊ भाग पाणी यांचें मिश्रण करून, त्या मिश्रणांत तीं साधनें वीस मिनिटें ठेवावीं. ( ह्याला १० % फो. मिश्रण म्हणतात. )

( ३ ) एक भाग रसायन आणि एकोणीस भाग पाण्याच्या मिश्रणानें आपले हात धुवावे व खुर्च्यादि सामानसुमान पुसण्यासाठीं ह्याच मिश्रणाचा उपयोग करावा. त्वचारोग व जखमा यांना जर प्रत्यक्ष हस्तस्पर्श झाला असेल, तर ह्या मिश्रणानें हात धुतल्यानें रोगप्रसाराचा धोका नाहींसा होतो. ( ह्याला ५ % फो. मिश्रण म्हणतात. )

( ४ ) धातूचीं हत्यारें उकळत्या पाण्यांत घातल्यानें त्यांना गंज येऊं नये, म्हणून पाण्यांत थोडासा धुण्याचा सोडा टाकावा.

( ५ ) विजेचीं हत्यारें, ७० टक्के आल्कोहोल मध्यें कापसाचा बोळा बुडवून त्यानें पुसून काढावीं.

( ६ ) हातमशीनचीं पातीं प्रथम घासलेट तेलांत बुडवून साफ करावीं, मग जंतूनाशक रसायनांत बुडवावीं.

( रसायनासाठीं व इतर कामासाठीं जें पाणी वापरावयाचें तें स्वच्छ असावें. )

## ग्राहकांशीं कसें वागावें ?

केशकर्तनालय कसें असावें याचा वर विचार झालेला आहे. केशकर्तनालयांतील व्यवस्था, रचना आणि स्वच्छता कशी असावी याची माहिती दिली. आतां ग्राहकाशीं कसें वागावें, या संबंधानेंहि थोडासा विचार करून व्यावहारिक सूचना देणें, मी माझें कर्तव्य समजतों.

## सूचना

धंदा म्हणजे मग तो कोणताहि असो, ग्राहक हाच प्रत्येक धंद्याचा खरा प्राण असतो. ग्राहक हा कल्पतरु आहे. तो आपलासा झाला तर वैभवाला काय तोटा ? ग्राहक प्रसन्न होणें हीच आपल्या धंद्यांतील भरभराटीची खरी गोम आहे. यासाठीं ग्राहकांबरोबर कसें वागावें, याचा नीट विचार केला पाहिजे. तो विचार करायचा म्हणजे आपण स्वतः ग्राहक आहांत अशी कल्पना करून, आपल्या दुकानाकडे व दुकानांतील नोकरांच्या अगर स्वतःच्या कामाकडे आधीं गिऱ्हाईकाच्या नजरेनें पाहायला शिकलें पाहिजे. आपण गिऱ्हाईक म्हणून आपल्याच दुकानांत आलों, तर आपला काय ग्रह होईल ? काम बघून समाधान होईल का ? प्रसन्न वातावरण बघून संतोष वाटेल का ? टापटीप व शिस्त बघून परत त्या दुकानांत यावेंसें वाटेल का ? इत्यादि अनेक प्रश्न आपण आपल्या मनाला विचारावे आणि आपलें मन काय कौल देतें तें पहावें.

मनानें होकारार्थी उत्तर दिलें, तर तुमच्या दुकानांत गिऱ्हाईकांची गर्दीच गर्दी होईल, हें भविष्य वर्तवायला कोणत्याहि ज्योतिषाची गरज नाहीं! पण जर का एखाद्या अगर सर्वच प्रश्नांचें उत्तर तुमच्या मनानें नकारार्थी दिलें, तर मात्र ते ते दोष दूर करण्यासाठीं झटणें जरूर आहे.

ज्याच्या जीवावर आपण आपला धंदा चालवणार आणि चार पैसे कमविण्याचा प्रयत्न करणार, त्याच ग्राहकांशीं बेपर्वाईनें अगर उद्धट-पणानें वागून कसें बरें चालेल? गिऱ्हाईकानें दुकानांत पाय टाकल्या-बरोबर, 'काय कटकट तरी! कशाला ही ब्याद पिडायला आली?' असा उलटा विचार मनांत आणून, आपण जर त्याच्याशीं तिरस्कारानें आणि कंटाळल्यासारखें करून कपाळाला सतरा आंठ्या घालून वागूं लागलों, तर तें गिऱ्हाईक चुकूनतरी परत आपल्या दुकानाचा उंबरठा ओलांडील का? तुसडेपणानें अगर परकेपणानें तुम्हीं त्याच्याशीं वागूं लागलां, तर त्याला तरी तुमच्याविषयीं आपलेपणा नि प्रेम कां वाटावें बरें? म्हणून, ग्राहकांशीं—मग तो गरीब असो अगर श्रीमंत असो, सुशिक्षित असो अगर अशिक्षित असो, तरुण असो अगर वृद्ध असो, देखणा असो अगर कुरुप असो, बक्षिस देणारा असो अगर बक्षिस न देतांच जाणारा असो—अदबीनें, प्रेमाने व हंसतमुखानेंच वागलें पाहिजे. माझ्या माहि-तीचे एक यशस्वी दुकानदार आहेत, त्यांची अशी एक खुबी आहे कीं, स्वतःच्या दुकानाची सजावट ते स्वतःच्या देखरेखीखालीं सदैव सुंदर अशी ठेवतात. ग्राहकाला प्रसन्नता वाटेल अशा गोड शब्दांत ते प्रत्येकाचें स्वागत करतात. ग्राहकांच्या केशभूषेचें काम चाललें असतांना, जातीनें देखरेख करतात. आणि त्याचा त्यांना भरपूर मोबदलाहि मिळतो. कारण त्यांच्या दुकानांत ग्राहक नाहीं, असा एक क्षणहि जात नाहीं. गर्दीच्या वेळीं गिऱ्हाईकें तासन्तास तिष्ठत बसतील, पण दुसरीकडे जाणार नाहींत!

## धंद्यांतील यशाची गुरुकिल्ली !

**योग्य !** (आ. नं. ४०) **अयोग्य !**

वेळच्या-
वेळीं
कामावर
हजर रहा !





अनियमित-
पणांत तुम-
चेंच नुक-
सान आहे.

स्वभावांत
नम्रता
आणि
कामांत
दक्षता
असूंद्या !





अशी बेप-
र्वाई
तुमच्या
नाशास
कारणीभूत
होते !

केंस, कपडे
इत्यादि
स्वच्छ,
नीटनेटके
असूं द्या !
दिसण्यांत
उमदेपणा
असावा !





बेछूट वर्त-
णूकीनें व
घाणेरड्या
संवयीनें
तुम्हींच
तुमचे शत्रू
व्हाल !

काम काळ-
जीपूर्वक
कराल तर
तुम्ही
गिऱ्हाई-
कास प्रिय
व्हाल !





आपलें
काम धस-
मुसळे-
पणानें
कधींच
करूं
नका !

हें कां ? त्या दुकानांत होणाऱ्या हार्दिक स्वागतामुळेंच नाहीं का ? सारांश, ग्राहक हा परमेश्वर आहे असें ज्या दुकानदाराला वाटेल, त्याच्याच दुकानावर परमेश्वराची कृपादृष्टि वळेल, इतरांच्या नाहीं. म्हणून गिऱ्हाईकाशीं कसें वागावें, या संबंधानें मी कांहीं व्यावहारिक सोपेसाधे नियम खालीं देत आहें, ते खात्रीनें उपयुक्त ठरतील. त्याचप्रमाणें आ. नं. ४० मध्यें 'योग्य आणि अयोग्य' असे जे प्रकार दाखविलेले आहेत, तेहि पहावेत.

**नियम—**

( १ ) तुम्हीं कोणाशीं खाजगी संभाषण करीत बसलां असाल, तर ग्राहक दुकानांत येतांच तें बंद करा, आणि उठून अदबीनें उभे रहा.

( २ ) हसंतमुखानें व तत्परतेनें त्याचें प्रेमानें स्वागत करा. तो आपल्या घरीं आलेला आपला एक महान पाहुणा आहे, असेंच घटकाभर समजा, आणि '**अतिथि देवो भव**' ह्या आपल्या प्राचीन ऋषींच्या आज्ञेप्रमाणें, त्याला अगदीं देव समजूनच त्याच्याशीं वागा.

( ३ ) त्याची गरज जाणून घेण्यासाठीं चित्त एकाग्र करा आणि कामास सुरवात करण्यापूर्वीं आणि काम करतांना, त्याच्या आवडीनिवडीप्रमाणें काम करा. आपल्या आवडी गिऱ्हाईकाच्या माथीं मारण्याचा प्रयत्न करूं नका. यदाकदाचित् तुमचें म्हणणें एखाद्या गिऱ्हाईकाला पटवून द्यायची पाळी आलीच, तर तें समजावून सांगण्याचा प्रयत्न करा. तुमच्या बोलण्यांत नम्रता, मार्दव आणि गोडी असूं द्या.

( ४ ) नवीन ग्राहक दुकानांत येण्यापूर्वीं, तुमच्याविषयीं त्याचा कसलाच ग्रह नसेल; पण जातांना मात्र त्याच्या मनांत बरा अगर वाईट

यांपैकीं कोणतातरी एक ग्रह खात्रीनें उत्पन्न होणार ! म्हणजे जपून वागूनच त्याचें मत तुमच्याविषयीं अनुकूल होईल असें करा !

( ५ ) तुमच्याकडून कामांत अगर कर्तनांत चूक झाली आणि त्याबद्दल ग्राहक संतापून बडबडूं लागला, तर तुम्हींहि त्याच्याबरोबरच संतापूं नका. तो काय म्हणतो तें नीट ऐकून घ्या. उत्तर द्यावें लागलेच, तर तें जपून शांतपणें द्या. आपल्या हातून चूक झालीच असेल, तर चटकन् प्रामाणिकपणें कबूल करून मोकळे व्हा ! म्हणजे गिऱ्हाईकाचा चढलेला पारा क्षणांत उतरेल ! '**अतृणे पतितो वन्हि स्वयमेवोपशाम्यति**' हें सुभाषित सतत नजरेसमोर ठेवा !

( ६ ) तुम्हीं मालक असा अगर नोकर असा, तुम्ही जनतेचे सेवक आहांत हें विसरूं नका. जनताजनार्दनाची सेवा करण्याचें काम आपल्या धद्यानें साधतें, ही खरोखरच मोठ्या भाग्याची गोष्ट आहे, असाच आपला समज असला पाहिजे. आपला धंदा कमी प्रतीचा आहे अशी चुकीची समजूत करून घेऊन, स्वतःमध्यें न्यूनगंड निर्माण होऊं देऊं नका. सेवा हा एक धर्म आहे. ती साधीसुधी बाब नाहीं; फार कठीण गोष्ट आहे. आणि म्हणून '**सेवाधर्मो परम गहनो योगिनामप्यगम्यः**' असें म्हटलेलें आहे. अर्थात् सेवाधर्म हा पवित्र भावनेनें आचारणांत आणला पाहिजे व कर्तव्य-बुद्धीनेंच त्या सेवाधर्माचें पालन केलें पाहिजे. आपापलें कर्तव्यकर्म नियमितपणें, चोखपणें करणें यांतच आपलें हित असतें व त्यांतच यश सांठलेलें असतें. '**स्वे स्वे कर्मण्याभिरतः संसिद्धिं लभते नरः**' असें म्हटलेलें आहे, त्यांतील भावार्थ तोच आहे.

(७) पुष्कळ नाभिकांना विड्यासिगारेट ओढण्याचें अगर पानतंबाखू खाण्याचें व्यसन असतें. वास्तविक तसलीं व्यसनें लोकसेवकाला असूं नयेत; पण जर असलींच, तर त्या व्यसनांचा गिऱ्हाईकांना उपसर्ग होणार नाहीं, अशी खबरदारी घ्यावी. विड्यासिगारेट ओढणाऱ्याच्या हातांना व तोंडाला दुर्गंधी येत असते. कित्येक गिऱ्हाईकांना तर तंबाखूचा वासहि सहन होत नाहीं. ती घाण त्याच्या मस्तकाला बसते नि कित्येकदां तर एखाद्या गिऱ्हाईकाला ओकारीहि येण्याचा संभव असतो. म्हणून कामापूर्वीं हात व तोंड धुवावेंच, शिवाय आपलें तोंड गिऱ्हाईकापासून शक्यतों दूर ठेवण्याचा प्रयत्न करावा. त्यामुळें दुसराहि असा फायदा होईल कीं, एकमेकांचा श्वास एकमेकांच्या श्वासांत मिसळणार नाहीं. तसेंच कित्येकांना तोंडांत पानतंबाखूचा तोबरा भरून काम करायची संवय असते, तीहि गिऱ्हाईकाच्या दृष्टीनें वाईट असते. कारण त्यामुळें काम करीत असतांनाच मधून मधून काम सोडून थुंकीच्या पिचकाऱ्या मारण्यासाठीं बाहेर जावें लागतें, आणि त्यामुळें अर्थांतच गिऱ्हाईकाला किळस येतो. म्हणून कामावर असतांना पानतंबाखू खाण्याची तलफ थोडी आवरून धरण्यास शिकावें.

ह्या सात गोष्टींचा मननपूर्वक अभ्यास करून धंदा करणाऱ्या नाभिकाला यश, कीर्ति आणि संपत्ति यांची प्राप्ति झाल्यावांचून राहाणार नाहीं, याची खात्री बाळगावी.

कोणत्याहि धंद्यांत यश मिळविण्यासाठीं **साहस, सामर्थ्य, आत्मविश्वास, आणि एकाग्रचित्तता** ह्या चार गुणांची गरज असते.

आपल्या धंद्यांत यश मिळविण्यासाठींहि त्याच गुणांची गरज असते. यशोमंदिराच्या ह्या चार पायऱ्याच आहेत, असें म्हटलें तरी चालेल! त्या सर्व पायऱ्या मोठ्या हिंमतीनें चढायच्या आहेत असा निर्धार करून, कंबर बांधून कामाला लागा, कीं यशाचा वांटा तुमच्या पदरांत पडलाच म्हणून समजा!

## मालकांशीं हितगुज

वरील सात गोष्टी म्हणजे केशकर्तनाच्या धंद्यांतील सात सूत्रेंच आहेत. तीं सूत्रें केशकर्तनालयांतील नोकराप्रमाणेंच त्यांच्या मालकांनींहि ध्यानांत ठेवलीं पाहिजेत. शिवाय मालकांनीं आणखीहि कांहीं महत्त्वाच्या गोष्टींचें पथ्य पाळलें पाहिजे असें मला वाटतें, आणि म्हणूनच खास त्यांच्यासाठीं खालील कांहीं गोष्टी केवळ प्रेमळ सूचना म्हणूनच केशकर्तनालयांच्या मालकवर्गाला देऊं इच्छितों.

(१) तुमच्या धंद्याचा खर्च डोईजड होऊं देऊं नका; आटोक्यांत ठेवा. आय व व्यय यांची योग्य प्रकारें तोंडमिळवणी करा.

(२) गिऱ्हाईकाच्या दृष्टीनें आपल्या दुकानाकडे व दुकानांत होणाऱ्या कामाकडे पहा. दोष दिसतील ते त्वरित काढून टाका. विलंब लावूं नका.

(३) नोकरांना त्यांच्या दर्जाप्रमाणें प्रेमानें वागवा. कुटुंबांतील वडीलधारीं माणसें लहानाशीं वागतात, त्याचप्रमाणें तुम्हीं आपुलकीनें व जिव्हाळ्यानें त्यांच्या सुखदुःखांची व अडीअडचणींची विचारपूस करा. त्यांना मदत करण्यासाठीं स्वखुशी दाखवा. तुम्हीं त्यांचे मालक असलां तरीहि तुम्हींच त्यांचे

पालक आहांत असें समजा. जरूर त्या सवलती द्यायला मागें पुढें पाहूं नका. नोकर संतुष्ट राखल्यानें ते गिऱ्हाईकांना संतुष्ट राखूं शकतील. **नोकर म्हणजे गुलाम नव्हे,** हें पक्कें ध्यानांत ठेवा.

( ४ ) नोकरांच्या न्याय्य व रास्त मागण्यांचा सहानुभूतिपूर्वक विचार करा.

( ५ ) नोकर हे नोकर आहेत. अर्थात् त्यांच्याशीं तुमची बरोबरी करूं नका. त्यांच्या हातून कांहीं चुका झाल्या तर **प्रथम क्षमा** करा, पुन्हा त्याच चुका झाल्या तर त्यांची **सौम्य व योग्य शब्दांत कानउघडणी** करा, पण चिडूनसंतापून उगीच चटकन् एकेरीवर येऊं नका. स्वतःचा मान स्वतः राखला पाहिजे. नाहींतर मालकीच्या गुर्मींत जाल तर अपमान करून घ्याल.

( ६ ) नोकरांचे पगार नियमितपणें वेळच्यावेळीं द्या. त्यासाठीं त्यांना संपाचें हत्यार उपसायला लावूं नका. अडचण असलीच तर नोकरांना विश्वासांत घ्या व त्यांच्याच साहाय्यानें पेंचप्रसंगांतून मार्ग काढा.

( ७ ) नवीन नोकर ठेवतांना, तो ज्या ठिकाणीं पूर्वीं कामाला होता, त्या मालकाचा दाखला मागा. तुमच्याकडील नोकर नोकरी सोडून जातांना, नोकरी सोडण्याचें कारण व त्याची वर्तणूक यासंबंधानें बरावाईट योग्य तो खरा उल्लेख करून, तुम्हीहि त्याला रीतसर दाखला द्या.

ह्या साध्या सात गोष्टींचें पथ्य आपण पाळाल, तर नोकरवर्ग तुमच्या आज्ञेबाहेर जाणार नाहींच; उलट तुम्हीं नोकरांचे लाडके मालक व्हाल, व त्यांच्या प्रेमास पात्र व्हाल !

## नोकरांना हितोपदेश

मालक आणि नोकर यांचे संबंध जेवढे जिव्हाळयाचे आणि प्रेमाचे असतील, तेवढी तिथें शांति आणि आनंद नांदेल ! मालकांनीं जसे कांहीं निर्बंध पाळले पाहिजेत, त्याचप्रमाणें नोकरांनींहि कांहीं नियम पाळले पाहिजेत. नोकरांच्या बाबतींत मालकांचीं जशीं कांहीं कर्तव्यें असतात, तशीं मालकांच्या बाबतींत नोकरांचींहि कांहीं कर्तव्यें असतात. मालक म्हणजे नोकरांच्या श्रमांवर श्रीमंत होणारा एक भयंकर प्राणी आहे, अशी सर्वसाधारण नोकरांची एक ठाम समजूत झालेली असते. परंतु सर्वच मालकांच्या बाबतींत एकच समजूत करून घेणें अन्यायाचेंच नव्हे काय ? एखादा नियम असला तरीहि त्याला अपवाद असतो ! मग तुमचा मालक दयाळु आणि चांगला नाहीं, असें तुम्हीं कशावरून ठरवतां ? तसा कांहीं त्याचा तुम्हाला अनुभव आला आहे का ? तो दुष्टच आहे, अशी तुमची पूर्ण विचाराअंतीं खात्री झालेली आहे का ? आणि जर तशी खात्री झालेली असेल, तर ज्या कारणांनीं तशी खात्री झालेली असेल, तीं कारणें शुद्ध आणि सत्य आहेत का ? कीं स्वार्थी हेतूनें केवळ आपला कार्यभाग साधला नाहीं, म्हणून त्याला तुम्हीं दुष्ट मानण्याचा अविचार करीत आहांत ? कोणाविषयीं बरें-वाईट, अनुकूल-प्रतिकूल मत बनवतांना आपली दृष्टि आणि विचारशक्ति शुद्ध, न्याय्य, निःपक्षपाती आणि स्वार्थरहित असली पाहिजे. मालक म्हणजे वाईट, हें त्रिकालाबाधित सत्य नव्हे ! मालक वाईट असूं शकतो तसाच बराहि असूं शकतो.

आणि तो कसाहि असला, तरीहि त्याचें तुमच्या बाबतींत रास्त धोरण व वर्तन राहील असें करणें हें बऱ्याच अंशीं तुमच्याच हातांत असतें; असेंच तुम्हीं शांतपणें थोडासा विचार कराल तर तुमचें तुम्हालाच कळून येईल ! मालक खूप चांगला असला, पण त्याच्या नोकरांनीं जर त्या चांगूलपणाचा गैरवाजवी फायदा घ्यायला सुरवात केली, तर चांगला मालक-सुद्धां कटु अनुभवामुळें 'वाईट' बनूं शकतो. मालक हा माणूसच आहे, अर्थात् त्याला आलेल्या अनुभवांचा त्याच्या स्वभावावर व धोरणावर बरा-वाईट परिणाम हा व्हायचाच ! म्हणून उगीच दुसऱ्याला वाईट ठरविण्या-पूर्वीं त्या वाईटपणाला आपण कारणीभूत आहोंत कीं काय, याचा प्रत्येक नोकरानें स्वतःच्या मनाशीं आधीं नीट सूक्ष्म विचार करायला हवा. माझी खात्री आहे कीं, तुम्हीं चांगले असाल तर तुमचा मालकहि चांगला असेल ! चांगला नसेल तर तो तुमच्या चांगूलपणानें चांगला बनेल ! यासाठीं मालकाला दुष्ट किंवा वाईट ठरविण्यापूर्वीं, प्रथम मालकाच्या नजरेनेंच मालकाच्या दृष्टिकोनांतून स्वतःच्या वर्तनाकडे व कामाकडे पहायला शिका. आधीं आपल्यांतील दोष शोधा, ते काढून टाका, आणि मगच दुसऱ्याचे दोष शोधण्याच्या कामाला लागा. 'आपण हंसे लोका आणि शेंबूड आपल्या नाका' असें होऊं देऊं नका. आधीं आपण चांगलें व्हावें, कीं मग जगहि चांगलें होतें. सारांश, अंतर्मुख बनून आधीं आत्मसंशो-धन करा. मालकाकडे आणि इतरांकडे बघण्याची दृष्टि साफ ठेवा, ती पूर्वग्रहदूषित अगर गैरसमजयुक्त ठेवूं नका. मालकाशीं हितगुज करतांना मी जशा कांहीं गोष्टी नमूद केलेल्या आहेत, तशाच कांहीं सूचना केश-कर्तनालयांत काम करणाऱ्या नोकरांनाहि देणें इष्ट वाटतें. '**ग्राहकांशीं कसें वागावें ?**' हें तर प्रत्येक नोकरानें अभ्यासावेंच, परंतु आपल्या प्रगती-साठीं व उद्धारासाठीं, प्रत्येक नोकरानें ज्या कांहीं खास गोष्टी लक्षांत

ठेऊन आपला कामधंदा केला पाहिजे, त्या मी खालीं देत आहें. नोकरांना त्या सूचना सतत मार्गदर्शक ठरतील अशी माझी खात्री आहे.

## सूचना

(१) प्रत्येक नोकरानें आपल्याला नेमून दिलेल्या कामावर, नेमून दिलेल्या वेळीं, अगदीं वक्तशीरपणें हजर राहिलें पाहिजे. वक्तशीरपणा ही नोकराच्या यशोमंदिराच्या पायाची कोनशीला आहे.

(२) आपल्याकडे सोंपविलेलें काम काळजीपूर्वक करून, ग्राहकाची (व मालकाचीहि) मर्जी संपादन करण्यासाठीं झटलें पाहिजे.

(३) अधिक पगार अगर वरची जागा मागण्यापूर्वीं, प्रत्येक नोकरानें आपली हुशारी, व लायकी, जास्त निर्दोष काम करून सिद्ध करण्यचा प्रयत्न केला पाहिजे.

(४) मालकाच्या अगर मालकानें नेमलेल्या त्याच्या प्रतिनिधीच्या आज्ञा बिनबोभाट पाळल्या पाहिजेत. आज्ञा पाळणाराच पुढें आज्ञा करण्याच्या योग्यतेस पोंचतो. आज तुम्हीं नोकर असलां तरी उद्यां मालक होणार नाहीं कशावरून ? मालक झाल्यावर तुम्ही दुसऱ्यांना आज्ञा करणार आहांत ना ? तुमच्या आज्ञा तुमच्या नोकरांनीं पाळल्या नाहींत तर तुम्हाला काय वाटेल बरें ? ह्यावरून तुम्हीं मालकाच्या आज्ञा पाळल्या नाहीं, तर तुमच्या मालकाला काय वाटेल, याची कल्पना करूं शकतां.

(५) कामाच्या वेळांत इतर कामें करूं नका. तुमच्या कामांतच मन एकाग्र करा.

(६) निष्कारण गैरहजर राहून, गिऱ्हाईकाची गैरसोय आणि मालकाचें व तुमचें नुकसान करूं नका.

(७) दुकानाची जी शिस्त असेल ती मोडूं नका. शिस्त नसेल तिथें शिस्त लावण्याचा शिस्तशीर प्रयत्न करा.

(८) तुमचे कपडे स्वच्छ ठेवा. केंससुद्धां नीटनेटके विंचरा. ते भूता-सारखे अस्ताव्यस्त ठेवूं नका. तुम्हीं दुसऱ्याचा चेहरा ठाकठीक करणार, मग तुमचा स्वतःचा चेहरा ठाकठीक नसून कसें चालेल ?

(९) दुकानांतील अनेक वस्तू तुमच्या स्वाधीन असतात. कधींकधीं गल्लाहि तुम्हाला सांभाळावा लागतो. याचा अर्थ असा कीं, त्या बाबतींत मालकानें तुमच्यावर विश्वास टाकलेला असतो. अर्थात् त्याचा विश्वासघात करण्याचें पातक करूं नका. तो गुन्हा आहे. दुकानांतील वस्तू चोरून स्वतःची बेअब्रू करून घेऊं नका. गेलेली वेळ जशी परत येत नाहीं, त्याचप्रमाणें गेलेली अब्रूहि परत येत नाहीं. चोरी करणें हा भयंकर गुन्हा आहे. तो महाभयंकर दुर्गूण आहे. तो दुर्गूण जडला, तर तुमच्या आयुष्याची माती होईल. हा धोक्याचा लाल कंदील सदैव आपल्या नजरेसमोर ठेवा.

(१०) आपण आपल्या स्वतःच्या वस्तू जितक्या काळजीपूर्वक वापरतों, तितक्याच दुकानांतील वस्तूहि जपून वापरायला शिका. बेपर्वाइनें काम करून, किंवा घाईघाईनें कसेंबसें काम उरकून टाकण्याच्या धांदलींत सामानसुमानाची अगर हत्यारांची मोडतोड करूं नका. मालकाचें नुकसान तें तुमचेंच नुकसान आहे, अशा भावनेनें काम करा.

(११) आपलें हिताहित आपणच ओळखायला शिकलें पाहिजे. त्या बाबतींत परावलंबी राहाणें योग्य नव्हे. नोकरांच्या संघटना पाहिजेत, एकजूट पाहिजे, हें खरें. पण ही संघटना चांगल्यासाठीं व कल्याणासाठींच असली पाहिजे. उठल्या सुटल्या मालकांशीं झगडण्यासाठींच संघटनांचा उपयोग करण्यापेक्षां त्या संघटनेचा उपयोग '**एकमेकां साह्य करूं अवघे धरूं सुपंथ**' ह्या न्यायानें मालकांशीं सहकार्य करून आपलाहि कार्यभाग साधण्यासाठीं केलेला बरा नाहीं का? आपल्या मागण्या रास्त व न्याय्य आहेत, व त्या मिळविण्यासाठीं आंखलेला मार्ग कायदेशीर आहे, याची आधीं खात्री करून घ्यावी. आणि नखाच्या कामाला कुऱ्हाडी लावण्याची वृत्ति सोडावी. प्रेम जोडतें वैर तोडतें!

(१२) सामोपचारानें आपआपसांतील तक्रारी सोडविणें, हटवादीपणानें आपल्याच मागण्यांना शेवटपर्यंत चिकटून न राहातां काळवेळ पाहून तडजोड करणें, वाटाघाटी चालू असतांना दंगाधोपा अगर धाकडपटशा न दाखविणें, शक्य तों आपल्या भांडणांत उगीच परक्या कोणाला हस्तक्षेप करूं न देणें, हा आपल्या मागण्या पदरांत पाडून घेण्याचा, सरळ, सोपा आणि बिनखर्चाचा राजमार्ग आहे, हें ध्यानांत ठेवा.

(१३) संपाचें शस्त्र मोठें चमत्कारिक आहे. तें नीट वापरलें तर ठीक, नाहींतर बुमरँगसारखें वापरणाऱ्याच्याच मानेवर बसायचें! म्हणून वाटेल त्या भूलथापांना अगर चिथावणीला बळी पडून, स्वतःचें हंसें व नुकसान करून घेऊं नका.

स्वतंत्र बुद्धीनें थोडा सारासार विचार करायला शिका !
‘ **मुकीं बिचारीं कुणी हका । अशीं मेंढरें बनूं नका ॥** ’
हा सदुपदेश सदैव ध्यानांत ठेवा.

(१४) नवीन काम करायला सुरवात करतांना प्रथम लहान मोठ्या चुका होतील, पण हिंमत सोडूं नका. चुका झाल्यावर त्या प्रामाणिकपणें कबूल करा आणि त्या सुधारण्याचा प्रयत्न करा. चूक झाली म्हणून हातीं घेतलेल्या कामांत माघार घेऊं नका. पुढचें पाऊल पुढें पडूं द्या; मागें घेऊं नका. चूक ही आपल्याला शिक्षण देणारी शिक्षकीण आहे असें समजा. अनुभवानेंच सुधारणा होते.

(१५) आपापल्या कामांत कितीहि अडथळे आले, संकटें आलीं, तरी डगमगून धीर खचूं देऊं नका. चेंडू खालीं आपटला तर तो जसा उसळून वर उडतो, तशी तुमच्या मनाची अवस्था झाली पाहिजे ! ‘ **केलाजरी पोत बळेंचि खोल । ज्वाला तरी ती वरती उफाळे** ’ असें झालें पाहिजे. जसजशा अडचणी येतील, तसतशी चिकाटी वाढली पाहिजे. तरच तुमची प्रगति होईल व उत्कर्षाचें आणि वैभवाचें उत्तुंग शिखर तुम्हाला गांठतां येईल !

(१६) आपल्याला अजून पुष्कळच शिकायचें आहे, ही भूक सतत अतृप्त असूं द्या. आपल्याला सर्व कांहीं येतें, आतां शिकायचें कांहींच उरलें नाहीं, अशी खुळचट कल्पना करून घेण्यांत नुकसान आहे हें जो जाणतो, त्यालाच उद्धाराचा मार्ग सांपडतो. कोणतेंहि ज्ञान मिळविण्याच्या बाबतींत अल्पसंतुष्ट

पणा असूं नये. एखादें काम इतरांपेक्षां तुम्हाला अधिक चांगलें येत असेल, अगर एखाद्या गोष्टीची तुम्हालाच इतरांपेक्षां जास्त माहिती असेल, तर तेवढ्यानें चढून जाऊं नका. '**एकाहुनि चढ एक जगामधीं, थोरपणाला मिरवूं नको**' हें सुभाषित ध्यानीं आणा. गर्वानें फुगून जाल तर पुढची पायरी गांठतां येणार नहीं. प्रगति खुंटेल! '**गर्वाचें घर खालीं**' हें विसरूं नका.

(१७) व्यसन मग तें कसलेंहि असो, त्यापासून चार पाऊलें दूर राहाण्याची शपथ घ्या. व्यसन लागल्यावर तें सोडण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां, आधीं व्यसन न लावून घेण्याची जो दक्षता बाळगतो, तोच खरा शहाणा. मात्र लागलेलें व्यसन सोडूं नये असा मात्र याचा अर्थ नव्हे. व्यसनानें शारीरिक, मानसिक, अर्थिक आणि नैतिकहि अधःपात होतो. हानी होते. माणूस माणूसकींतून उठतो. समाजकंटक बनतो. म्हणून आधीं व्यसनांना कायमचा रामराम ठोका, आणि शरीर निकोप, सुदृढ आणि धष्टपुष्ट बनवायच्या तयारीला लागा. '**शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्**' असें म्हणतात याचा अर्थ हाच आहे कीं, शरीर निरोगी असेल, तरच तुम्हीं तुमचा कामधंदा करूं शकाल. कोणतेंहि कार्य करायला आधीं शरीर मजबूत पाहिजे. आरोग्य नसेल तर सर्व व्यर्थ आहे. पैसा मिळवायला आणि मिळवलेल्या पैशांचा उपभोग घ्यायला आधीं तुमची प्रकृति उत्तम असली पाहिजे. त्यासाठीं सकस अन्न खा, भरपूर व्यायाम करा, आणि शुद्ध वातावरणांत राहाण्याची शिकस्त करा. **ज्याचें शरीर खंबीर त्याचें मनहि खंबीर असतें.**

(१८) आपल्याला कुठेंहि नोकरी मिळेल, अशी आपल्या मनाची खुळी समजूत करून घेऊं नका. ती केवळ घमेंड आहे. पोकळ आशावाद आहे. असल्या मृगजळाच्या मागें धावून निराशा आणि नुकसान यांचे धनी बनूं नका. हातचें सोडून पळत्याच्या मागें लागणें म्हणजे मूर्खपणाच होय ! म्हणून एखादें काम स्वतः होऊन सोडतांना मागचापुढचा विचार करा. राजीनामा देणें, काम सोडणें सोपें असतें. नोकरी मिळवणें, काम मिळणें फार कठीण असतें. यासाठीं उगीच भाकरीवर लाथ मारण्याचा अविचार करूं नये.

(१९) कामदारापुढें दोन प्रमुख रस्ते असतात. शिस्तीचे नियम पाळून, नियमितपणानें आपला कामधंदा सचोटीनें व चाणाक्षपणानें करून सुख, यश, पैसा व नांवलौकिक मिळविणें हा एक रस्ता; आणि आळसांत आयुष्याची खराबी करून, कामचुकारपणानें, हटवादी स्वभावानें, व्यसनांच्या नादीं लागून दारिद्र्य, दुःख, अपयश व बेअब्रू यांचा धनी होणें हा दुसरा मार्ग ! यापैकीं चांगला रस्ता कोणता नि वाईट कोणता हें सांगायला का हवें ?

कामदारांनीं आपलें व आपल्या कुटुंबियांचें आणि पर्यायानें समाजाचें व देशाचेंहि हित साधण्यासाठीं, वरील सर्व सूत्रांचा मननपूर्वक विचार करावा व त्याप्रमाणें आचरण ठेवून स्वतःचा स्वतःच उद्धार करून घ्यावा !

